असा करावा. आणि अध्युपदेश असें पद सूत्रात आलें आहे, त्याचा अर्थ सर्वांपेक्षा अधिक असा करावा मग सर्वांपेक्षा अधिक सुख तें कोणाचें? ते विष्णूचेच म्हणून भूमा पदाचा अर्थ विष्णूच यावर वल्लभाचार्यांचें म्हणणें असें आहे कीं भूमा म्हणजे भगवान्. सम्प्रसाद शब्दाचा अर्थ पूर्ण निद्रा. आता पूर्ण निद्रेच्या पलीकडीलहि वर्णन आहे. म्हणून ते वर्णन भगवानास लागू पडतें पण पूर्ण निद्रेच्या पलीकडील विषयावर त्या वर्णनाचें पर्यवसान कसें करावें? कारण, पूर्ण निद्रेच्या अवस्थेमध्यें असता दुसरें काही पाहत नाहीं असहि वर्णन आहे म्हणून असं खरें कीं हें वर्णन जितकें भगवानास लागू पडतें तितकें जीवासहि लागू पडतें तथापि त्या प्रकरणीं अधिक धर्माचें वर्णन आलें आहे. तें असें. "तोच खाला, तोच वर, तोच पश्चिमेस, तोच पूर्वस, तोच दक्षिणेस, तोच उत्तरेस, तोच हें सारें" तेव्हा भूमा म्हणजे प्राण असं कसें म्हणता येईल? पूर्णनिद्रेच्या सबधान "हें सारें" असें वर्णन कसें करता येईल? म्हणून पूर्ण निद्रेच्या पलीकडे भगवान् आहे असं स्पष्ट आहे त्या प्रकरणामध्य आत्मा म्हणून जो शब्द आला आहे त्याचा अर्थ सुख असा करावा आणि जे जे काहीं आहे, त्यामध्यें सर्व आहे असें म्हणता येतें. कारण कीं, परब्रह्माचा परिणामच सर्व जगत् आहे. आणि तें परब्रह्माचा आधार धरूनच राहत आहे म्हणून भूमा शब्दाचा अर्थ भगवान् असाच करावा.

mâ means the *Lord* and that *Samprasâda* means complete sleep The Upanisad describes, however, that there is something beyond complete sleep, and this description applies to the Lord There is an objection, however, to such an application of the Upanisad text There is another Upanisad text which states that, when in the condition of complete sleep, he sees nothing From this the conclusion is that the Upanisad text applies as well to the human spirit as to the Supreme Lord The reply to this objection is—the additional attributes mentioned in the same context do not admit of such an application "He is, indeed, below, he is indeed, above, he is, indeed, in the west, and in the east, he is, indeed, in the south and in the north, he is indeed, all this universe' How can Bhûmâ which is so described refer to Breath (Prâna)? and how can all this universe be mentioned in reference to complete sleep? It *is plain*, therefore, that the Lord is beyond complete sleep Again the term soul or Âtmâ used in the same context signifies happiness, and whatever is, comprises the universe or all, because the universe is the Supreme Spirit transformed, and the universe exists in the Supreme Spirit or is supported by it and, therefore, the term Bhûma signifies the Lord On this Râmanuja observes —the Supreme Brahma is said to be beyond truth in order that it may be directly seen in a vision. If there were such a description, how could the Brahma be comprehended? How could it be seen face to face?

यावर रामानुज असे म्हणतात कीं, ब्रह्माचा साक्षात्कार व्हावा म्हणून अमक्याच्या पलीकडे तें असें वर्णन केलें आहे असें जर वर्णन नसलें तर ब्रह्म कसें कवटाळावें? आता ब्रह्माचा साक्षात्कार कसा करून घ्यायाचा? सत्यरूप ब्रह्माची उपासना करावी, हाच ब्रह्मसाक्षात्काराचा उपाय ब्रह्माचें लक्षण तरी काय? ज्यापेक्षा काहीच अधिक नाहीं, अतिशयापेक्षा अतिशय, सर्वांपेक्षा विपुल जें सुख, असा जो परमपुरुष तेच ब्रह्म म्हणून प्राण अशी त्यास संज्ञा दिली आहे कारण, प्राण हा सर्वांच्या अंतर्यामी असतो त्याच्या पलीकडेहि सत्य. आणि सत्य हें ब्रह्माचें रूप असे वर्णन असल्यामुळें भूमा म्हणजे परब्रह्मच. या रामानुजाच्या उपन्यासाचा कटाक्ष असा की, नारायण म्हणून परम पुरुष आहे त्याचा जीवास साक्षात्कार होतो, आणि त्याचे गुण जीवाच्या अंगीं येतात आणि अशा रीतीनें नारायणाचा आणि जीवाचा अद्वैतभाव आहे. या संबधानें जीं उपनिषद्वाक्य आलीं आहेत त्याचें भाषान्तर एणें प्रमाण "भूमा जो तोच जाणण्याची इच्छा करावी. म्हणून भगवान्, भूमा जाणण्यास मी इच्छितों ज्या स्थितमध्यें दुसर काहीं पहात नाही, दुसरें काहीं ऐकू येत नाही, दुसरें काहीं विशेष समजण्यात यत नाही, तोच भूमा आणि ज्या स्थितीमध्यें दुसरे दिसत, दुसरें ऐकू यत, दुसरें जाणता येत, दुसरें समजण्यात येत ते अल्प अरे, जो भूमा तच अमृत" "भगवाना

Brahma in the form of truth ought to be worshipped This is the means of obtaining its direct sight (Sakṣâtkâra) What is the definition of Brahma? That which nothing exceeds, exceeding excess itself Excessive and most immense happiness, such highest person is Brahma Hence it is called Prâna (breath) because Prana pervades the hearts of all Truth is beyond Prâna, and truth is the form of Brahma, and, therefore, Brahma is called Bhumâ (abundance) The bearing of these remarks made by Ramânuja is—Nârâyana is the highest person He is directly seen by the human spirit, which can acquire most of his attributes, and thus be identified with Him The following is the translation of the Upanisad texts quoted in connection with this sûtra "Abundance (Bhûmâ) is, indeed, to be desired to be known. I, therefore, oh Lord, desire to know Bhûmâ That is abundance (Bhûmâ) which seen, he sees nothing else, he hears nothing else, he desires to know nothing else That is small (Alpa) which seen, he sees something else, he hears something else, and he knows something else That which is Bhûmâ, is indeed immortal "I have heard from some like yourselves that he, who knows the spirit, gets over sorrow Then Oh Lord, here I sorrow, Lord, take me to the other end of sorrow Lord, what exceeds a name? The tongue, indeed, exceeds a name + + + Lord, what exceeds the tongue? + + + The mind is greater than the tongue.

As the spokes of a wheel are fixed in a nave, so in the breath

सारख्याच्या योगानें शोकाच्या पार आत्मा-जाणणारा जातो. असें मी ऐकिलें आहे. आणि भगवान्, असा मला शोक प्राप्त झाला आहे. म्हणून भगवान्, शोकाच्या पार आपण मला न्यावें. + + + भगवान्, नामापेक्षा मोठें काय? + + नामापेक्षा वाणी मोठी + + वाणीपेक्षां भगवान्, मोठें काय? वाणीपेक्षा मन मोठें आहे. + + + अरे, आशेपेक्षा प्राण मोठा. अरे गाडीचे आरे जसे तुंब्यामध्यें बसविले असतात, तसे ह्या प्राणामध्यें सर्व बसविलें आहे. प्राणच बाप, प्राणच आई, प्राण भाऊ, प्राण बहीण, प्राण आचार्य, प्राण ब्राह्मण, + + + प्राण, आशा, इत्यादि सर्व सोडून त्याच्या पलीकडे काही आहे असें म्हणणारा तू आहेस. होय मी असा आहे असें म्हणावें, दडवूं नये. अरे, असें जो योगी म्हणतो तो सत्यावर अवलंबन करून म्हणतो. तो मी, अहो भगवान्, सत्यावर अवलंबन करून असें म्हणतो. + + + अरे, जो भूमा तें सुख. भगवान्, तें सुख कशामध्यें राहतें? अरे, तें सुख स्वतांच्या महिम्यामध्यें राहतें. ज्याच्या सार्‍या वासना सुटल्या आहेत त्याला भगवान् सनत्कुमार अधकाराचें पैल तीर दाखवितो." "ऐकत नाही, पहात नाहीं, प्राण हे अग्नि या पुरच्याठायीं जागृत असतात. + + + या ठिकाणीं या देवास स्वप्नें पडत नाहीत. म्हणून या शरीरामध्यें हू सुख होतें." "सत्य, ज्ञान, अनंत असें ब्रह्म." "मुक्त होण्यास दुसरा मार्ग नाहीं."

(Prâna) all is fixed. The breath, indeed, is the father, the breath is the mother, the breath is the brother, the breath is the sister, the breath is the teacher, the breath is the Brâhmana and the breath is greater than a desire. You assert that leaving off all these desires and breath, there is something beyond them. Yes, state that you are so, do not conceal this He, who states this, depends upon truth, depending upon truth, Oh Lord, I say this. That, which is the greatest, is happiness Where does this happiness dwell? It dwells in its own greatness. Lord Sanat-kumâra shows the other bank of darkness to him, who has broken the (trammels of) desires He dose not hear, he does not see The fires of breath are there blazing in that town (in the body). Here the God sees no dreams. Hence in this body he obtains happiness" "Truth and knowledge and infinitude—this (is) Brahma" "There is no other way of salvation."

सूत्राणि,

धर्मोपपत्तेश्च ॥ ९ ॥

भावार्थः। सत्यत्वं स्वमहिमप्रतिष्ठितत्वं सर्वगतत्वं सर्वात्मत्वमिति चैते धर्माः श्रूयमाणाः (आम्नाताः) परमात्मन्येवोपपद्यंते नान्यत्र। तस्माद् भूमा परमात्मेति सिद्धमिति शंकरः॥ अतः परमात्मनः प्रत्यगात्मशरीरकत्वज्ञानप्रतिष्ठार्थमद्ब्रह्मोपासनं कर्तव्यं तस्माद् भूमगुणविशिष्टः परमात्मेतिसिद्धमिति रामानुजः॥ अन्यमतोपन्यासस्तु साधारणः॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

यो वै भूमा तत् सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं + +। यत्र नान्यत् पश्यति नान्यच्छृणोति नान्यद् विजानाति स भूमा + + यो वै भूमा तदमृतं। छां० उ० (७.२४,१.)॥ यत्र त्वस्य सर्वमात्मैवाऽभूत्। तत् केन कं पश्येत्। बृ० आ० उ०। (४.३,२९.)॥ एषोऽस्य परम आनंद एतस्यैवानंदस्याऽन्यानि भूतानि मात्रामुपजीवंति। बृ० आ० उ० (४.१,३१.)॥ अतोऽन्यदार्तं। बृ० आ० उ० (३.५,१.)॥

## ९. पुनः धर्माची उपपत्ति होते ह्मणून.

९. "कोणत्या धर्माची उपपत्ति होते? ते सत्य आहे. ते आपल्या महिम्याचे ठायीं राहिले आहे. ते सर्वांच्या ठायी आहे तें सर्व आत्मा" अशा या धर्माचे निरूपण उपनिषदामध्यें आले आहे त्याची परमात्म्याच्या ठायी योजना केल्याने उपपत्ति योग्य होते. दुसरीकडे त्याची योजना करू नये म्हणून भूमा म्हणजे परब्रह्म अशा या सूत्राचा शङ्कराचार्यांनीं अर्थ केला आहे रामानुज या संबधाने असें म्हणतात की, प्रत्येक जीवाच्या ठायी परमात्मा आहेच आहे हें ज्ञान दृढ व्हावे म्हणून मी परब्रह्म अशी उपासना करावी म्हणजे भूमा हा गुण परमात्म्याचा आहे असे सिद्ध होतें दुसऱ्या भाष्यकारानी यावर विशेष उपन्यास केला नाही या संबधानें पुढील उपनिषद्वाक्ये आलीं आहेत "जो भूमा तेंच सुख. अल्पाच्या ठायीं सुख नाहीं भूमा तेंच सुख" "जेथें दुसरें दिसत नाहीं, दुसरें ऐकू येत नाहीं, दुसरें जाणता येत नाहीं, तो भूमा" 'जेथे याला सर्व आत्माच होऊन गेला, मग कोणी कोणाला पहावें!" "याला हा परमानंद. या परमानंदाचा जो अंश (मात्रा) त्यावर दुसरी भूतें अवलंबतात" "म्हणून दुसरें (सारें) पीडित आहे."

## 9. Again, because the attributes are explained, (Bhûmâ is Brahma).

9 What attributes are explained? It is truth It abides in its own greatness It pervades every thing It is all soul These attributes are described in the Upanisads When they are referred to the Supreme Spirit, they are adequately explained. They cannot be otherwise explained Greatness (Bhûmâ), therefore, is Brahma This is the way Shankarâchârya comments upon this sutra Râmânuja observes —there is the Supreme Spirit in every human spirit To strengthen and confirm this knowledge, one may worship the human spirit as the Supreme Spirit. Then the attribute of greatness (Bhûmâ) is proved to belong to the Supreme Spirit Other commentators say nothing upon this sûtra The following Upanisad texts bear upon it. "That, who is greatness, is happiness There is no happiness in what is small! Therefore, greatness (Bhûma) is happiness"

Which seen, he sees nothing else, he hears nothing else, he knows nothing else, that is Bhûmâ. What is Bhûmâ, is immortal When it is seen, everything has become unto him the spirit, then by means of what, what can he see?" "To him this is the highest happiness, obtaining only a portion of this happiness, other elements exist. Therefore, every thing else is distressed.'

सूत्राणि.

अक्षरमंबरांतधृतेः ॥ १० ॥

भावार्थः। बृहदारण्योपनिषदि यद् वाक्यं तस्मिन्ननुसंधास्यमाने वाक्येऽक्षरपदस्य परब्रह्मपरत्व। न जीवपरत्वं न वर्णपरत्वं न प्रधानपरत्व वा। कथं। अंबरांतानां पृथ्व्यादीनां विधारकः परमात्मैव। चतुर्भिर्वेदांतवादिभिरस्य सूत्रस्याऽयमेवार्थो गृहीतः। आगमिष्यद्भ्यां द्वाभ्यां सूत्राभ्यां सूत्रार्थं द्रढयत्याचार्यः॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि॥

आकाश एव तदोत च प्रोत चेति कस्मिन् न्वाकाश ओतश्च प्रोतश्चेति। स होवाच। एतद् वै तदक्षर गार्गि ब्राह्मणा अभिवदत्यस्थूलमनणु। बृ०आ०उ०(३.८,८.)॥ अक्षरसमाम्नायः म० भा० (१.१,२,४३)॥ ओंकारएवेद् सर्वं। छां० उ० (२.२३,४.)॥ एतद् वै तदक्षर गार्गि यस्मिन्नाकाश ओतश्च प्रोतश्चेति। बृ० आ० उ० (३.८,११.)॥

सा च प्रशासनात् ॥ ११ ॥

भावार्थः। सा चांबरांतधृतिर्नाम धारण परमेश्वरस्य कर्म। पूर्वस्मिन् सूत्रे यदुक्त तद्व्याख्याऽस्मिन् सूत्रे हेतुर्निरूपितः। परमात्मा पृथिव्यादीन् प्रशास्तीति। वल्लभादिभिः स्वसिद्धांताऽनुसारेण विशेषतः सूत्र न निरूपित॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि॥

एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्याचंद्रमसौ विधृतौ तिष्ठतः। बृ० आ० उ० (३.८,९)॥

१०. अक्षर ह्मणजे परब्रह्म; कारण आकाशापर्यंत तें सर्व धारण करतें.

११ पुनः तें (धारण) त्याच्या आज्ञेवरून होतें.

10. The term Aksara signifies the Supreme, Spirit, because it holds all including the heavens.

11. Again, the universe is held together by the command of the Supreme Spirit.

१०. उपनिषद्वाक्याच्या अर्थाविषयी विचार चालला आहे. त्यात कोणी पूर्वपक्षकार असें म्हणतो की, या पुढील वाक्यामध्यें अक्षर-पदाचा अर्थ वर्ण असा करावा, ब्रह्म असा करूं नये. ती वाक्यें हीं " आकाशामध्येंच तें ओतप्रोत भरलें आहे. बरें, आकाश ओतप्रोत कशामध्यें भरलें आहे? तो म्हणाला हें रे तें अक्षर, गार्गि. ब्राह्मण असें म्हणतात की, तें स्थूल नाहीं आणि तें अणु नाहीं " " अक्षराचा समुदाय." "ॐकारस्वरूप हे सर्व आहे." "ज्यामध्यें आकाश ओतप्रोत भरलें आहे तें हें अक्षर, गार्गि." पूर्वपक्षकार असे म्हणतो की, या वाक्यामध्ये अक्षर म्हणजे वर्णांचा समुदाय, ॐकार म्हणजे ॐकाररूप वर्णच असा वर्णांवरच कटाक्ष असल्यामुळे अक्षर म्हणजे वर्ण असा अर्थ खरा. यावर शंकराचार्य म्हणतात – असें नव्हे. अक्षर म्हणजे परब्रह्म. कारण पृथ्वीपासून तों आकाशांपर्यंत सर्वांचें धारण करणारें अक्षर आहे असें वर्णन असल्यामुळे वर्ण असा अर्थ करता येत नाहीं. कारण, वर्णांकडून पृथ्वीचें, आकाशाचें धारण कसें समेल? पुन. अक्षर म्हणजे जीव नव्हे;

10 The sense of Upanisad-texts is discussed An opponent states that the term Aksara used in these texts signifies a letter, and not the Supreme Spirit The Upanisad texts referred to are —"that completely fills the heavens. Well, what do the heavens completely fill? He said, well, this well-known Aksara, Oh Gârgi. The Brâhmanas state—it is not gross, it is not fine" "The Veda is an assemblage of letters, (aksara)" "This is all in the form of the syllable *om*" "That is this Aksara, Gârgi, which the heavens fill" The opponent bases upon these texts his proposition and argues that the word Aksara used in reference to the mystic syllable *om* or in reference to the Veda as an assemblage of letters cannot but signify a letter Against this, Shankarâchârya observes —that the term Aksara refers to the Supreme Spirit, because a letter as such cannot be said to hold all the universe from the earth to the heavens Such a statement is simply absurd. Again, the term Aksara does not refer to the human spirit, nor to the active power characterized by the Sânkhyas as Prakriti. Other schools of Vedântins do not offer any particular comment upon this sûtra.

सूत्राणि.

अन्यभावव्यावृत्तेश्च ॥ १२ ॥

भावार्थः । अक्षरं न जीवो न प्रधानं न वा वर्णः । एतेषामन्येषां पदार्थानामक्षरशब्दवाच्यत्वं व्यावर्त्यते दर्शनश्रवणमननविज्ञानादिर्धर्मः । एते धर्मा अचेतनप्रधानादिषु न संभवति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अचक्षुष्कमश्रोत्रमवागमनः । + + + तद्वा एतदक्षरं गार्गि । अदृष्टं द्रष्टृश्रुतं श्रोत्रमतं मंत्रविज्ञातं विज्ञातृ नाऽन्यदस्ति द्रष्टृ नाऽन्यदस्ति श्रोतृ नाऽन्यदस्ति मंतृ नाऽन्यदस्ति विज्ञातृ। बृ० आ० उ० (३.८,११.)॥

---

अक्षर म्हणजे सांख्यमतांतील प्रधान नव्हे. या सूत्रावर दुसरे वेदांतवादी विशेष व्याख्या करीत नाहींत

११ मागील सूत्रीं जे निरूपण केलें आहे त्यास बळकटी यावी म्हणून हे सूत्र रचिलें आहे; आणि प्रमाणाकरता दुसरें उपनिषद्वाक्य घतलें आहे ते हें "अरे गार्गि, ह्या अक्षराच्या आज्ञेवरून सूर्य आणि चंद्र (आपआपलीं ठिकाणं दृढ धरून राहतात)" आज्ञा म्हटली म्हणजे त्यामध्यें पाहणें, एकणें मनन करणें आणि विचार करणें ह्या साऱ्या शक्ति असल्याच पाहिजेत ह्या शक्ति ज्यामध्ये नाहींत त्याला आज्ञा कशी करता येईल ? किंवा तो आज्ञा करतो असें म्हणणें कसें संभवेल ? म्हणून अक्षर म्हणजे परब्रह्मच, असें म्हणणें योग्य आहे आपआपल्या मताच्या अनुरोधानें अक्षरपदाचा अर्थ वेदांत-वादी करतात शंकराचार्य म्हणतात अक्षर म्हणजे परब्रह्म. रामानुज म्ह-

11 This sûtra strengthens the statement made in the preceding sûtra An additional text from the Upanisad is adduced in its support The text is — "Oh Gârgi, by the command of the Supreme Spirit, the Sun and the Moon stand firm" The notion of a command involves inspection, audience, meditation, and consideration He, that does not possess these powers, cannot give a command. The term Aksara, therefore, cannot signify a letter It, therefore, signifies the Supreme Spirit The Vedantins interpret the term Aksara into Visnu or Nârâyana to suit their system Shankarachârya states that Aksara is the Supreme Spirit. Râmânuja, the highest Person Nârâyana Madhvâchârya interprets Aksara into Visnu, and Vallabha into that spirit which is at once the cause and the effect or the spirit itself or the material universe

## १२. पुन, दुसरे धर्मांचें व्यावर्तन केलें आहे ह्मणून.

णतात अक्षर म्हणजे पुरुषोत्तम नारायण मध्वाचार्य म्हणतात अक्षर म्हणजे विष्णु वल्लभाचार्य म्हणतात अक्षर म्हणजे कार्यकारणरूप ब्रह्म

१२ अक्षर म्हणजे परब्रह्म हेंच ठरविण्याकरता हें सूत्र रचलें आहे आणि प्रमाणाकरता दुसरीं उपनिषद्वाक्यें घेतलीं आहेत तीं हीं "त्याला चक्षु नाहीं, त्याला श्रोत्र नाहीं, त्याला वाक् नाहीं, त्याला मन नाहीं, तें रे हें अक्षर गार्गि जे दुसऱ्याला दिसत नाहीं पण जें दुसऱ्याला पहाणारें, दुसऱ्याच्या श्रवणांत येत नाहीं, पण जें दुसऱ्याचें श्रवण करतें, ज्याचें मनन करता येत नाहीं, पण जें दुसऱ्याचें मनन करतें, ज्याचें विज्ञान दुसऱ्यास होत नाहीं, पण ज्याला दुसऱ्याचें विज्ञान स्पष्ट आहे, त्यावाचून दुसरा पहाणारा नाहीं, त्यावाचून दुसरा ऐकणारा नाहीं, त्यावाचून दुसरा मनन करणारा नाहीं, त्यावाचून दुसरें कोणास विज्ञान होत नाहीं". या वाक्यामध्ये दुसऱ्याच्या गुणाचें व्यावर्तन केलें आहे म्हणजे दुसऱ्याच्या अंगीं अमुक गुण नाहीत, आणि तेच गुण परब्रह्माच्या ठायीं आहेत ते गुण तरी कोणते? दर्शन, श्रवण, मनन, विज्ञान, हे गुण ब्रह्मावाचून दुसऱ्याच्या अंगीं असणें संभवत नाहीं सांख्यमतामध्यें प्रकृति म्हणून ज्या शक्तीचें वर्णन केलें आहे, तिच्या अंगीं स्वतः काहींच करण्याचें सामर्थ्य नाहीं. तो अ-

## 12 Again, because of the exclusion of other properties.

12 This sûtra supports the statement—that Akṣara is the Supreme Spirit—and adduces additional Upaniṣad texts "It has no eyes, it has no ears, it has no speech, it has no mind, that is this Akṣara, Oh Gârgi Though it cannot be seen by others, yet it sees others. Though it cannot be heard by others it hears others Though it cannot be meditated on by others yet it meditates on others Though it cannot be comprehended by others it comprehends others It alone sees, it alone hears, it alone meditates, it alone comprehends" This text excludes the properties of others It states that other existences do not possess certain properties which the Supreme Spirit possesses These properties are attributes of intelligence, sight hearing meditation, and comprehension It is not possible for any existence except Brahma to possess these attributes The active power called Prakriti by the Sankhyas is material and cannot move of itself. It, therefore cannot possess these attributes The human spirit also cannot possess these attributes How can then a mere letter or a syllable like *om* possess them? Hence the term Akṣara does not signify either the Prakriti of the Sankhyas or the human spirit or the mystic syllable *om*, but the Supreme Spirit

निरूप्य परं ह्यग्रे निरूपयति । तथैव श्लोके तिस्रो मात्रा इ-
त्यादि । अभिध्यानस्य हि साक्षात्कारः फलं । अतः फलरू-
पज्ञानस्य विषयत्वात् परपुरुषः परमात्मैवेति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

एतद् वै सत्यकाम परं चाऽपरं च ब्रह्म यदोंकारस्तस्माद् विद्वानेतेनै-
वायतनेनैकतरमन्वेति । + + + यः पुनरेतं त्रिमात्रेणैवोमित्येतेनैवाऽक्षरेण
परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि सूर्ये संपन्नः । यथा पादोदरस्त्वचा वि-
निर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं ।
स एतस्माज् जीवघनात् परात् परं पुरिशयं पुरुषमीक्षते । प्र० उ०
( ५.५. ) ॥ पुरुषान् न परं किंचित् सा काष्ठा सा परा गतिः । क०
व० (३.११.) ॥ तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति । छा०उ०(६.२.३.)॥

चेतन आहे. मग तिच्यामध्यें दर्शन, श्र
वण, मनन, विज्ञान, हे गुण असणें कसें
संभवेल ? मनुष्याच्या जीवाच्या अंगीं
तरी हे गुण आहेत असें कसें संभ-
वेल ? पुनः ॐकारासारख्या व-
र्णाच्या अंगीं हे धर्म आहेत असें म्हणणें
कसें संभवेल ? म्हणून अक्षर शब्दाचा
अर्थ सांख्यमतातील प्रकृति किंवा मनु
ष्याचा जीव किंवा ॐकारासारखा वर्ण
असा नव्हे. तर अक्षर म्हणजे परब्रह्म

**१३. तो परमात्मा; कारण पाहणें या धातूचें कर्म तो, असें निरूपण आहे.**

**13 That is the Supreme Spirit, because he is described as the object of the verb *sees* used in an Upanisad.**

---

१३ या सूत्रावर निरनिराळ्या भाष्यकारांनी जी टीका केली आहे ती अवलोकन करण्याजोगी आहे या सूत्राच्या संबंधानें उपनिषद्वाक्यें घेऊन जीव परमात्मा, ब्रह्मलोक, जीवघन इत्यादिकांची व्यवस्था केली आहे ती उपनिषद्वाक्याच्या अर्थावरून लक्षात येईल 'अरे सत्यकाम, हें ब्रह्म उत्तम आणि कनिष्ठ असें दोन प्रकारचें आहे तेंच ॐकार म्हणून विद्वान् जन त्यापैकी एकाचा आश्रय करून एकाच्याच मागें लागतो. + + पुनः जो पुरुष त्रिमात्र ॐकारपद उच्चारून या उत्तम पुरुषाचें ध्यान करील तो सूर्यरूप तेजाच्या ठायीं मिळेल जसा सर्प आपली कात टाकतो तसा हा पापपुरुषापासून मुक्त होऊन त्याला ॐकाररूप सामगाणी ब्रह्मलोकास नेतात या जीवघनाच्या पलीकडे आणि सर्व प्राणिमात्राच्या शरीरामध्यें वास करणारा जो उत्तम पुरुष त्याला असा हा ब्रह्मलोकास पोहोंचलेला प्राणी पाहतो' "पुरुषापेक्षां उत्तम दुसरें कांहीं नाहीं ती पराकाष्ठा, ती उत्तम गति" 'आपण पुष्कळ होऊन प्रजा उत्पन्न करावी असें त्यास वाटलें" या उपनिषद्वाक्यांना नि[illegible] भाष्यकारांनी निरनिराळा [illegible] केला आहे ती अशी या वा[illegible] पूर्वपक्षकार असें म्हणतो

13 The remarks made upon this sūtra by different commentators deserve attention In the Upanisad texts quoted in connection with this sutra, the terms—the human spirit, the Supreme Spirit, the region of Brahma or heaven, and Jīva ghana—occur The relationship between these is to be adjusted. The bearing of this relationship will be plain from the translation of the Upanisad text 'Oh Satyakama the spirit (Brahma) is either high or low It is, indeed the mystic syllable *Om* Therefore, a wise man seeks shelter from one of them and follows it. Again, a person who pronounces the mystic syllable *Om* consisting of three moras and contemplates the highest person will be absorbed in the Sun. As the serpent casts its skin so a person, delivered from the power of sin, is taken to the Brahma-loka or heaven, while the psalms, consisting in the mystic syllable *Om*, are sung The human spirit thus attaining to heaven or Brahma loka, sees the Supreme Spirit who abides in all creatures and who is beyond the Jīva ghana" "There is nothing higher than the Supreme Spirit or the Person. He is the last limit. He is the highest condition." "He thought that he should procreate and multiply" The interpretation of these Upanisad-texts is adjusted by different commentators in differ-

र्वा, जीव भिन्न, ब्रह्म भिन्न, आणि ब्रह्मलोक भिन्न. तींच वाक्ये घेऊन वेदांतवादी त्याचें समाधान करतात त्या वाक्यामध्यें पर म्हणजे उत्तम असा शब्द आलेला आहे. त्याचा अर्थ पुरुष. तोच ब्रह्म. प्रत्येक आत्म्याच्या ठायीं त वास करतें आणि जीव त्याचें अवलोकन करतो जीवघन म्हणजे काय? जीव निरुपाधि आणि सोपाधि असतो उपाधिशून्य जीवाचा जो समुदाय तोच ब्रह्मलोक या ब्रह्मलोकावर ब्रह्म ब्रह्म दोन प्रकारचें. एक उत्तम आणि एक कनिष्ठ एक पर आणि एक अपर जें पर तें शुद्ध जें अपर तें जीवघनात्मक परब्रह्माचें नाव पुरुष हा पुरुष हीन काष्ठा परा गति, हीच उत्तम गति ॐकार पदाचा अर्थ परब्रह्म आणि अपरब्रह्म असा दोन्हीहि होतो परंतु ध्यान ज्याचें करायाचें तें परब्रह्म. आता उपनिषद्वाक्यांची एकवाक्यता करणें झाल्यास ब्रह्म पर आहे आणि ब्रह्म अपर आहे अशी व्यवस्था झाली पाहिजे. मुक्ति क्रमाक्रमानें होत जाते. ह्या मुक्तीचें निरूपण भगवद्गीतेमध्यें आणि छांदोग्य उपनिषदामध्यें केलें आहे तें असें तेज, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायण, संवत्सर सूर्य, चंद्रमा, विद्युत्— प्राणोत्क्रमण झाल्यानंतर इतक्या स्थळीं जीव जाऊन पुढें कोणी अमानुष पुरुष त्याला ब्रह्मलोकीं घेऊन जातो. अशा हा स्थलाचा क्रम आहे. याचें नाव क्रममुक्ति अशा प्रकारें या उपनिषद्वाक्याची शंकराचार्यांनी व्यवस्था केली आहे यावर रामानुजादि

ent ways Some opponent bases a statement upon these texts that the Supreme Spirit is distinct and different from the human spirit, and both from the Brahma loka or heaven. The Vedântins quote these texts and argue against the opponent The term *Para* or *high* used in the Upanisad texts signifies the Supreme Spirit or the Person It is the Brahma It abides in every soul or Âtmâ, and the human spirit sees it What is the sense of the term Jîva ghana? The human spirit is either enslaved by material conditions (Sopâdhi) or is free from them The assemblage of human spirits free from the power of material conditions constitutes Brahma loka, beyond which and higher than which is Brahma, which is seen in two forms—high (Para) and low (*Apara*) The former is pure Brahma and the latter is Jîva ghana The Supreme Spirit is called the Person, who is the last limit, the highest condition (of existence) The term *Om* includes both the higher and lower forms of the Supreme Spirit But the former alone is to be contemplated, The recognition of these two forms of Brahma alone can adjust the Upanisad texts, and harmonize them The human spirit is gradually delivered from the trammels of material conditions This gradual deliverance is described in the Chhândogya Upanisad and in the Bhagavad gîtâ It is this Light, day, bright fortnight, the summer solstice, the year, the Sun the Moon, lightening—after death the human spirit passes through each of these till some person, not

जीवघन क्रममुक्ति यांची व्याख्या करतात जीवघन म्हणजे ब्रह्मदेव, चतुर्मुख त्याला कर्म केल्यामुळे देह आहे मुक्तीचा क्रम कसा? तर ब्रह्म दोन प्रकारचें आहे हें कार्यब्रह्म, कारण-ब्रह्म नव्हे हे कार्यब्रह्म दोन प्रकारच आहे-ऐहिक आणि पारलौकिक ॐकारांत तीन मात्रा आहेत एक मात्रेच्या योगानें ॐकाराची उपासना केली असतां ऐहिक मनुष्य-लोकरूप जें ब्रह्म त्याचें प्राप्तिरूप फल होतें दोन मात्रा उच्चारून ॐकाराची उपासना केली असतां अंतरिक्ष लोकाची प्राप्ति होते, त्रिमात्रक जो ॐकार तच परब्रह्म त्याची उपासना केली असतां परब्रह्माची उपासना केली असें होतें, तदनंतर परब्रह्म प्राप्त होतें यावर मध्वाचार्य असें म्हणतात कीं, "आपण पुष्कळ व्हावें आणि प्रजा उत्पन्न करावी" असें उपनिषद्वाक्य आहे हें मुख्य वाक्य बाकी सर्व वाक्यांची या वाक्याशीं एकवाक्यता करून, निराळाच वाद उत्पन्न करून परब्रह्म म्हणजे विष्णु असा सिद्धांत करतात यावर वल्लभाचार्य असे म्हणतात कीं, जीवघन म्हणजे आधारभूत ब्रह्मलोक तें निराळें आणि परब्रह्म निराळें. हें परब्रह्म जीव पहातो ज्या उपनिषद्वाक्यांत त्रिमात्रक ॐकाराचें वर्णन केलें आहे त्याची व्यवस्था अशी करायाची ब्रह्म पर आहे आणि अपर आहे त्या उपनिषद्वाक्यामध्ये अपर ब्रह्माचें निरूपण प्रथम करून पुढें परब्रह्माचें निरूपण केलें आहे याविषयीं प्रश्नोपनिषदांत असें वर्णन आहे. "ॐकारांत तीन मात्रा आहेत त्या मर-

human, takes it to the Brahma loka This is the way the human spirit is gradually delivered. This is the way Shankarâchârya adjusts the interpretation of these Upanisad texts Râmânuja also adjusts the signification of Jiva ghana and gradual deliverance Jiva-ghana is the four faced Brahmadeva Because of his activity (Karma) he has got a material body What is the form of gradual deliverance? The Supreme Spirit or Brahma is seen in two forms,—as the cause and its effects The former is not identical with the latter The latter is of two kinds,—terrestrial and celestial The mystic syllable *Om* consists of three moras One mora of the mystic syllable being contemplated and worshipped the spirit attains to this world When two moras are contemplated and worshipped, the spirit attains to the firmament (Antariksa) The mystic syllable consisting of three moras is the Supreme Spirit itself When it is contemplated, the Supreme Spirit itself is contemplated, and the Supreme Spirit is attained About these Upanisad texts, Madhvâchârya observes —the text—'I may procreate and multiply'—is the principal and most important All other Upanisad texts quoted harmonize with this He makes this observation and concludes that the Supreme Spirit is Visnu Vallabhâchârya argues —Jiva ghana simply signifies heaven or Brahma loka, a sort of support to the emancipated spirits The Jiva-ghana is thus distinct from the Supreme Spirit which the human spirit sees. The Gradual deliverance described in the Upa-

ण्या अशा योजल्या आहेत त्या परस्परावर आसक्त आहेत त्यांचा परस्पराशीं संबंध आहे त्या आपआपल्या एकएक विषयामध्ये गुंतलेल्या आहेत त्यांची बाह्य, आभ्यंतर, आणि मध्यम, अशा कर्मे आहेत त्या त्या कर्मांमध्यें हे गुंतलेले पाहून पंडित दृढच्यादृढच राहतो, चळत नाहीं ' या श्रुतीमध्यें अपरब्रह्म कसें आहे हें वर्णिलें आहे तें मृत्युमय आहे अशा या ब्रह्माचें ध्यान केल्यानें ब्रह्माचा साक्षात्कार होतो आणि असा साक्षात्कार होतो म्हणून तें परब्रह्म ज्ञानगोचर आहे म्हणूनच जीव त्याला पहातो असें उपनिषद्वाक्यात वर्णन आहे आणि म्हणूनच त्याला परपुरुष, परब्रह्म अशीं नावें दिलीं आहेत

nisad is explained by Vallabhâcharya Brahma is either high or low First the latter is described in the Upanisad to pave the way for the explanation of the former

The Prashnopanisad states that the mystic syllable *Om* consists of three moras which are liable to death— + + + dependent upon and related to, one another, each of them is engrossed by the objects of its own activity Their activity is either external internal or middle Seeing them thus engaged the wise man stands firm is not moved This quotation explains what the lower Brahma is When it is contemplated, the human spirit realizes the higher Brahma and because the higher Brahma is so realized, it is an object of knowledge, and therefore the statement of the Upanisad that the human spirit sees the Supreme Spirit is explained and therefore it is called the high Person (Parapurusa or Parabrahma)

## दहर उत्तरेभ्यः ॥ १४ ॥

भावार्थः । अनुसंधास्यमान प्रथम वाक्य गृहीत्वा तत्र दहराकाशस्य ब्रह्मत्वमुपनिषदुत्तरेभ्यो वाक्येभ्यः सिध्यतीति सूत्रार्थः । तत्रोपमानोपमेयभावेन स्वस्वामिभावेनोपनिषत्स्यप्रतिसमाधानवचनेन वाक्यभेदभयेन वाक्यशेषेणोपक्रमोपसंहाराभ्यां चोपनिषद्वाक्यानामेकवाक्यतायां क्रियमाणायां दहराकाशस्य ब्रह्मत्वमेव सिध्यति न तु विज्ञानात्मत्व भूताकाशत्व वेति शंकराचार्यं सूत्रार्थं व्यवस्थापयति ॥ तदिद गुणाष्टक तत्तद्विशिष्ट दहराकाशशब्दनिर्दिष्टमात्मान चाऽविदुषामेतद्व्यतिरिक्तभोग्यकर्मसिद्धये च कर्म कुर्वतामंतवत्त्वफलावाप्तिमसत्यसकल्पता चाभिधाय + + + उदारगुणसागरस्य तस्य परमपुरुषस्य प्रसादादेव सर्वकामाऽवाप्ति॰ + अतो दहराकाशः पर ब्रह्मेति रामानुजः ॥ सत्यकाम. सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्य इत्यादिभ्य उत्तरेभ्यो गुणेभ्यो दहरो विष्णुरेवेति मध्वः ॥ दहरः परमात्मा न जीवः । कुतः । उत्तरेभ्यः उत्तरवक्ष्यमाणेभ्यो हेतुभ्यः । तेषामपि साध्यत्वादेवमुक्त । जीवो नाम भगवदंशो न भगवानेवेत्यग्रे वक्ष्यते । अशो नाना व्यपदेशादिति । नापि ब्रह्म तावन्मात्र । इदमप्यग्रे वक्ष्यते अधिक तु भेदनिर्देशादिति । तस्मादिद प्रकरण न जीवब्रह्मविद्यापर किं तु ब्रह्मवाक्यमेवेति वल्लभः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अथ यदिदमस्मिन् ब्रह्मपुरे दहर पुंडरीक वेश्म दहरोऽस्मिन्नंतराकाशस्तस्मिन् यदंतस्तदन्वेष्टव्य तद् वाव विजिज्ञासितव्यमिति ॥ १ ॥ त चेद् ब्रूयु॰ + किं तदत्र विद्यते यदन्वेष्टव्यं यद् वाव विजिज्ञासितव्य-

मिति ॥ २ ॥ स ब्रूयाद् यावान् वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदय आकाश उभे अस्मिन् द्यावापृथिवी अंतरेव समाहिते + + + एष आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः । + + + तद् यथेह कर्मजितो लोकः क्षीयत एवमेवाऽमुत्र पुण्यजितो लोकः क्षीयते + + + अथ य इहात्मानमनुविद्य व्रजन्त्येताꣳश्च सत्यान् कामाꣳस्तेषाꣳ सर्वेषु लोकेषु कामचारो भवति । छा० उ० (८ १,६.) ॥ स एतस्माज् जीवघनात् परात् परं पुरिशयं पुरुषमीक्षते । प्र० उ० (५.५) । स वा अयं पुरुषः सर्वासु पूर्षु पुरिशयः । बृ० आ० उ० (२.५,१८.) ॥

## १४. पुढल्या हेतूवरून दहर शब्दाचा अर्थ ब्रह्म

१४ या सत्रार्थें जो वाक्यें आहेत तीं छांदोग्य उपनिषदांत (८ १ ६) या ठिकाणीं येतात या वाक्यांच्या अर्थाची व्यवस्था करायाची आहे ती अशी प्रथम वाक्यांत जो दहर शब्द आला आहे त्याचा अर्थ ब्रह्म कारण बाकी राहिलल्या पुढल्या वाक्यामध्यें अशा प्रकारचें निरूपण आहे इतका सूत्रार्थ यावर शंकराचार्य असें म्हणतात कीं, उपमानोपमेय-संबंध, स्वस्वामिसंबंध शंका समाधान करण्याच्या रीतीनें, वाक्यभेद टाळण्याकरतां वाक्यशेष करून, किंवा ग्रंथाचा आरंभ आणि ग्रंथाची समाप्ति यावरून उपनिषद्वाक्यांचा एकवाक्यता करूं लागलें म्हणजे दहर शब्दाचा अर्थ विज्ञान-आत्मा किंवा भूताकाश असा होत नाहीं दहर शब्दाचा अर्थ ब्रह्म असाच होतो यावर रामानुज असें म्हणतात कीं,

## 14 Because of the latter reasons the word *Dahara* signifies Brahma

14 The Upanisad-texts that bear on this subject occur in (VIII 1 6) of the Chhândogya Upanisad—texts the interpretation of which is to be adjusted The term Dahara used in the first text signifies Brahma, because it is described in the other texts This is the sense of the sûtra Shankaracharya observes —the term *Dahara* does not mean either the enlightened human spirit or the sky because its sense is to be determined either by analogy or by the relationship of ownership or by the system consisting in raising and removing doubts or by the principle of avoiding the division of a sentence or by the examination of the commencement and the conclusion of a work The term *Dahara* therefore means Brahma Râmânuja observes —that the Highest Person possesses eight attributes which are described in

चालला आहे. या सबधानें जी उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्याचें भाषांतर एणे प्रमाणे 'पुढें जें हे या शरीरामध्ये ल्हान कमलरूप घर आहे त्यामध्यें आत आकाश आहे, तेंच दहर या आकाशाच्या आत काय आहे ते हुडकून काढायाचे, तेंच जाणायाचे हे जर तें असें ते म्हणतील तर जें हुडकून काढायाचें किंवा जाणायाचे तें हें काय आहे? तो म्हणतो जेव्हढें हें (बाह्य) आकाश तेवढेंच हृदयाच्या आत आकाश आहे या आकाशामध्ये पृथ्वी आणि आकाश दोन्ही आत माडलीं आहेत + + + हा आत्मा कसा? ज्यानें पापम्याचें निरसन केले आहे, ज्याला जरा नाहीं, ज्याला मृत्यु नाहीं, ज्याला शोक नाहीं, ज्याला खाण्याची इच्छा नाहीं, पिण्याची इच्छा नाहीं, जो सत्यसकल्प + + + तसाच मृत्युलोकीं कर्मे करून ऐश्वर्यास चढलेल्या लोकाचा जसा क्षय होतो तसा स्वर्गलोकी पुण्यवान् लोकाचा क्षय होतो + + + म्हणून इहलोकीं जे आत्म्याला प्राप्त करून परलोकीं जातात आणि जे सत्यकामादि अष्टगुणसपन्न होऊन स्वर्गास जातात त्याचा सचार सर्व लोकाच्या ठिकाणी यथेच्छ घडतो." छा० उ० (८ १,६)

"हा जीवघनापासून पलीकडील, शरीराच्या ठिकाणीं वास करणाऱ्या पुरुषाला तो पहातो." पुरिशय असें ह्याला का म्हणतात? "अरे, तो हा पुरुष सर्व शरीररूप पुरामध्यें राहतो म्हणून पुरिशय"

known They then asked—what is the nature of that which is to be searched and known? He says the ethereal space in the Dahara is as large as this ethereal space and contains this earth and the heavens + + + well, what is the nature of this spirit? He, who has destroyed personal Sin, who is above old age, death, *sorrow, thirst* and hunger, and whose desires and volitions never fail + + + The righteous in heaven *decay as those*, who have obtained prosperity in this world, by means of their acts, decay. *Hence those alone are able to go* about in all the worlds, who find the Supreme Spirit in this world and possessed *of the* eight qualities, ascend into heaven He sees the Person abiding in the body which is beyond the Jiva ghana' "(Why is he called the Purishaya?) Well, this Person abides in all bodies and is, therefore, called Purishaya—*Sarvâsu Pursu (shete)* This is Purishaya'

**गतिशब्दाभ्यां तथा हि दृष्टं लिंगं च ॥ १५ ॥**

भावार्थः । छांदोग्योपनिषत्स्थं गच्छंतिपदप्रयोगं प्रतिपदोक्तवचनं च गृहीत्वा ताभ्यां यदनुमीयते तेन दहराकाशस्य ब्रह्मत्वमेवोदाहरणबलात् सिध्यतीति सूत्रार्थः ॥ पूर्वस्मिन् सूत्रे दहरः परमेश्वर उत्तरेभ्यो हेतुभ्य इत्युक्तं । त एवोत्तरे हेतव इदानीं प्रपच्यंते इति शंकरः ॥ अहरहः सर्वदा सर्वासां प्रजानामजानंतीनां गतिरस्य परं ब्रह्मभावे लिंगं । इतश्च दहराकाशः परं ब्रह्मेति रामानुजः ॥ मध्वस्तु पुराणवाक्याद् लिंगं दर्शयति ॥ वल्लभः पृथ्वीशरावन्नदेव जीवब्रह्मविभागो न त्वज्ञानकृत इति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

इमाः सर्वाः प्रजा अहरहर्गच्छंत्य एतं ब्रह्मलोकं न विंदंति । छां० उ० (८.३,२.) ॥ सता सोम्य तदा संपन्नो भवति । छां० उ० (६.८,१.) ॥

**१५. तसेंच; जाणें या धातूच्या प्रयोगावरून आणि प्रतिपदोक्त वचनावरून अनुमान निघतें.**

**15. Again in the same way an inference can be drawn from the use of the term *to go* and from a direct statement.**

---

१५. या सबधानें जी उपनिषद्वाक्ये घतली आहेत त्याच्या अर्थावरून सूत्रार्थ सहज लक्षात येईल "ह्या सायाा प्रजा दररोज ब्रह्मलोकास जातात (पण) त्याना ब्रह्मलोक मिळत नाही." "तेव्हा, अरे सोम्य, सद्रूपाशीं तो मिळून जातो " पहिल्या वाक्यामध्यें जाणें या धातूचा प्रयोग कसा केला आहे हे स्पष्ट लक्षात येते त्यावरून असे सिद्ध होते का दहर शब्दाचा अर्थ ब्रह्मच. पुन दुसऱ्या वाक्यामध्ये सद्रूपी ब्रह्मास जीव मिळून जातो असें प्रतिपदोक्त वर्णन आहे त्यावरूनहि दहर शब्दाचा अर्थ आकाश असे सिद्ध होतें हें सिद्ध करण्याकरता सूत्रामध्यें श्रुतिप्रमाण लागू केलें आहे इतका सूत्रार्थ यावर शंकराचार्य असें म्हणतात कीं, पुढे येणाऱ्या कारणामुळें दहर-आकाश म्हणजे ब्रह्म असें पूर्वीच्या सूत्री सिद्ध झालें. त्याच कारणाचें विस्तारूपानें आता निरूपण करायाचें यावर रामानुज असें म्हणतात की, अज्ञान ह्या ज्या सायाा प्रजा त्या नित्य जातात असें जे निरूपण आहे ते निरूपणच अनुमान करण्यास कारण आहे. आणि त्यावरून दहर-आकाश म्हणजे परब्रह्म असं सिद्ध होतें यावर मध्वाचार्य पुराणातील वाक्य घेऊन प्रमाग

---

15. The sense of the sûtra will be plain from the Upanisad-texts on which it is based "All these people go every day to the region of Brahma, but they do not obtain it" "Well Somya, he is then united with the existant" In the first text the term *go* is directly used, and this gives grounds to infer that the term *Dahara* signifies the Supreme Spirit The second text directly states that the human spirit is united with the Supreme spirit Thus the method of proof called a direct statement by the Mîmânsakas (shruti) applies This is the sense of the sûtra About this Shankaracharya observes — in the former sûtra it is proved that the term *Dahara* signifies the Supreme Spirit because of the reasons to be given. These are now enlarged upon Râmânuja observes —the inference, that the term *Dahara* signifies the Supreme Spirit is based upon the statement that all these ignorant people every day go to the region of Brahma Madhvâchârya quotes texts from the Purânas in support of the same proposition Vallabhâchârya observes —the distinction between the human spirit and the Supreme Spirit is like the distinction between the solid earth and a vessel made out of it, and it is a delusion to maintain it

धृतेश्च महिम्नोऽस्याऽस्मिन्नुपलब्धेः ॥ १६ ॥

भावार्थ-। पूर्वेषु सूत्रेषु यद् दहराकाशस्य परब्रह्मत्वं निरूपितं तदा-त्रापि सूत्रमिदं। अत्र धृतिरूप एको हेतुः। स च सेतु-र्विधृतिरेषां लोकानामित्याद्युपनिषद्वाक्ये दर्शितः। तेन द-हराकाशस्य ब्रह्मत्वं न तु जीवत्वं न वा भूताकाशत्वं। धृ-तिर्नाम धारकं। धारकं येन यो महिमा तस्योपनिषद्वाक्यान्त-र्गतस्य दहरे एव पर्यवसानमिति सूत्रार्थः ॥ यथोदकसंतानस्य विधारयिता लोके सेतुः क्षेत्रसंपदामसंभेदायैवमयमात्मा एषा-मध्यात्मादिभेदभिन्नानां लोकानां वर्णाश्रमादीनां च विधारयिता सेतुरसंभेदायाऽसंकरायेति शंकरः॥ स चाऽयं परस्य ब्रह्मणो धृत्याख्यो महिमा अस्मिन् दहराकाशे उपलभ्यते। अतो दह-राकाशः परं ब्रह्मेति रामानुजः ॥ स हि सर्वाधिपतिः स हि सर्वेशानः स ईशः स विष्णुरिति मध्वः ॥ अस्यैतादृशानिरु-द्धधर्मोपपन्नस्य महिम्नोऽस्मिन् भगवत्येवोपलब्धेः। ज्याया-नाकाशाद् ज्यायान् वा अयमाकाशः अणुः स्थूल इति वल्लभ.॥ अनुभाष्ये सर्वोपनिषद्वाक्यानि ॥

**१६. (ब्रह्मांडाचें) धारण करणारा असा जो हा महिमा तो परब्रह्माच्या ठिकाणीं अढळतो म्हणून.**

**16. Because the glory of upholding the (universe) is met with in the Supreme Spirit**

दाखवितात वल्लभाचार्य यावर असें म्हणतात कीं, सारी पृथ्वी, आणि तिचाच अंश घेऊन केलेला एक घट, या दोहींमध्ये जसा भेद तसाच जीव आणि ब्रह्म यामध्ये जो भेद मानतात तो केवळ अज्ञानामुळें, वास्तविक तसा भेद नाहीं

१६. मागें दहर-आकाशाचा अर्थ परब्रह्म असें जे निरूपण झालें आहे त्यास बळकटी यावी म्हणून हें सूत्र रचलें आहे छांदोग्य,उपनिषदातील पुढील वाक्य लक्षात आणलें म्हणजे सूत्रार्थ सहज समजेल. "मग जो आत्मा तोच सेतु ह्या लोकाचा भेद होऊं नये म्हणून तो धारण करणारा आहे" या वाक्यावरून दहर-आकाश म्हणजे ब्रह्मच असें सिद्ध होतें. दहर-आकाश म्हणजे जीव नव्हे, दहर-आकाश म्हणजे दिसतें हें भूताकाशहि नव्हे तो या सर्व ब्रह्मांडाचे धारण करतो, हा केवढा त्याचा महिमा! असें तो जर न धारण करता तर हे निरनिराळे लोक जुटून एका ठिकाणी न राहते इतका सूत्रार्थ यावर शंकराचार्य असं म्हणतात कीं, व्यवहारामध्यें पाण्यावर जसा पूल बांधला असतो, आणि त्याच्या योगाने निरनिराळी जमीन जशी जोडली जाते तसाच अध्यात्म विषयामध्यें भेद पडून हे जे निरनिराळे लोक,

16. The sûtra supports the statement that Dahara signifies the Supreme Spirit A text from the Chhândogya-Upanisad elucidates *the sûtra* "*Then he, who* is the Supreme Spirit, is a cause-way He upholds this universe that it may not be broken up". This text proves that the term *Dahara* signifies the Supreme Spirit, and not the human spirit, nor the visible heavens How great is his glory that he upholds the universe! If he did not so uphold it, all these regions would fall asunder This is the sense of the sûtra About this Shankarâchârya observes —as in common life a cause way is built to connect different parts of the land so the Supreme Spirit is a cause-way, and he keeps together the different systems that there may be no difference in spiritual knowledge that the different regions may not fall asunder, and that the different stages of life may be passed in harmony, and *that there may not ensue a confusion of races* Râmânuja observes —why should the word Dahara be interpreted into the Supreme Spirit? Because the glory of the Supreme Spirit is met with in him who is described by the term Dahara. The glory is—he upholds all the regions Madhva observes — Visnu himself is the Supreme Spirit He protects all He is *the Lord of all* Vallabha ob-

## सूत्राणि.

### प्रसिद्धेश्च ॥ १७ ॥

भावार्थः । उपनिषत्सु परमेश्वरे आकाशशब्दः प्रसिद्धः । तस्याः प्रसिद्धेर्दहराकाशो ब्रह्म ॥ भूताकाशस्तु सत्यामप्याकाशशब्दप्रसिद्धावुपमानोपमेयभावासंभवान् न ग्रहीतव्य इति शंकर. ॥ अपहतपाप्मत्वादिगुणसनाथा प्रसिद्धिर्भूताकाशप्रसिद्धेर्बलीयसीत्यभिप्रायः । एवं तावद् दहराकाशस्य भूताकाशत्वं प्रतिक्षिप्तमिति रामानुजः ॥ दहर गगनं विशोकं तस्मिन् यदतस्तदुपासितव्यमिति प्रसिद्धेश्चेति मध्व॰ ॥ प्रकरणोक्तसर्वधर्मप्रसिद्धिर्भगवत्येव न जीवे संभवस्ततोऽपि भगवानेव दहर इति वल्लभ ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

दहरोऽस्मिन्नतराकाशः । छा० उ० ( ८.१,१. ) ॥ आकाशो वै नाम नामरूपयोर्निर्वहिता । छा० उ० ( ८.१४,१. ) ॥ सर्वाणि ह वा इमानि भूतान्याकाशादेव समुत्पद्यते । छां० उ० ( १.९,१. ) ॥

---

हे जे निरनिराळे वर्णाश्रम, हे तुटून मोडून पडूं नयेत, आणि वर्णसंकर होऊं नये, म्हणून हा आत्मा सेतु आहे, हा त्या सर्वांना धारण करतो यावर रामानुज असें म्हणतात कीं दहर-आकाशाचा अर्थ परब्रह्म असा कां करावा ? तर दहर-आकाश असें ज्याचें वर्णन केलें आहे, त्याच्या ठायींच परब्रह्माचा महिमा आढळतो तो महिमा असा कीं साऱ्या लोकाचा धारण करणारा तो यावर मध्वाचार्य असें म्हणतात कीं विष्णु परमेश्वर, तोच सर्वांचें पालन करणारा तोच सर्वांचा अधिपति आहे यावर वल्लभाचार्य असें म्हणतात

serves —The Supreme Spirit is as subtile as an atom and is as large as the heavens, nay, it is larger than the heavens. How great is his glory who combines such opposite attributes! All his glory is seen in the Supreme Spirit. The following is the translation of the Upanisad texts quoted "He is Dahara, that is, there is æther in him, then he, who is the Supreme Spirit, is a cause-way, and he upholds the regions that they may not fall asunder" "Well, the Sun and the Moon keep their places according as the Supreme Spirit (Aksara) commands them" "He is the Lord of all, he is the Lord

## १७. आणि असें प्रसिद्ध असल्यामुळें.

र्वी, ब्रह्म परमाणूसारखें सूक्ष्म असून या आकाशासारखें मोठ आहे आकाशापेक्षा मोठें आहे अस हे विरुद्ध धर्म ज्याच्या ठायीं आहेत त्याचा येवढा महिमा? हा सारा महिमा ब्रह्माच्या ठायीं अढळतो या सूत्राच्या सवधानें जीं उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें " दहर म्हणजे ह्यामध्यें आकाश आहे. + + + पुढे हा जो आत्मा तो सेतु आहे आणि हे लोक भिन्न होऊन पडू नयेत म्हणून तो त्याचें धारण करणारा *आहे" " अरे, ह्या अक्षराच्या आज्ञेमागें* सूर्य आणि चद्र आपआपल्या ठिकाणीं राहतात. " " हा सर्वेश्वर, हा भूताधिपति, हा भूतपाल, हा सेतु, निरनिराळ्या लोकांचा भेद होऊ नये म्हणून त्यानें हा धारण करणारा "

१७ उपनिषदामध्ये आकाश म्हणजे परमेश्वर असें प्रसिद्ध आहे. त्या प्रसिद्धीवरून दहर-आकाश म्हणजे परब्रह्म ह स्पष्ट आहे यावर शकराचार्य असें म्हणतात कीं, आकाश शब्दाचा हा भूताकाश असाहि अर्थ होतो आणि परब्रह्म असाहि अर्थ होतो. या दोन्हींचा उपमानोपमेय संबंध कसा बसविता येईल? हे स्पष्ट आहे कीं, ब्रह्मावरून भूताकाशाविषयीं समजूत करून घ्यावयाची यावर रामानुज असें म्हणतात कीं दहर आकाश म्हणजे परब्रह्म याकरितां त्यास भूताकाश म्हणता येत नाहीं ना?

## 17. And because it is well-known.

of all the regions, he is the protector of all beings, he is the cause way, he upholds these that they may work in harmony"

17 It is well known in the Upanisad texts that æther represents the Supreme Spirit It is plain, therefore, that the æther known as Dahara also represents the Supreme Spirit About this Shankaracharya observes —the term æther, which signifies the heavens, signifies also the Supreme Spirit How can the relationship of the parts of a comparison be established between them? *It is plain that* because the Supreme Spirit is known, the visible heavens are known Râmanuja observes —the æther known as Dahara signifies the Supreme Spirit It, therefore, cannot be interpreted into the visible heavens The Supreme Spirit has annihilated sin These attributes of the Supreme Spirit are well known, and the importance of this knowledge is greater *than that of the knowledge of* the visible heavens Madhvâchârya observes —Dahara is heaven and there is no sorrowing there and it is well known that he who dwells there, is to be worshipped The *term Dahara*, therefore, signifies *Visnu* Vallabha observes —from the description and the context, all those attributes are possessed by the Supreme Spirit, and not by the human spirit, and therefore, Dahara is, indeed the Supreme Spirit The following is the

सूत्राणि.

## इतरपरामर्शात् स इति चेन् नाऽसंभवात् ॥ १८ ॥

भावार्थः । जीवसंबंधिवाक्यशेषेऽनुमानं । तेन दहराकाशो जीवो भवेदित्युक्तं चेन् न । कुतः । असंभवात् । कथमसंभवः । ये धर्मा दहराकाशस्योपनिषत्सु निरूपितास्ते जीवसंबंधेन नोपपद्यते न संभवति च ॥ प्रपंचितं चैतत् प्रथमे सूत्रे । अतिरेकाशंकापरिहाराय तु पुनरुपन्यस्तमिति शंकरः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अथ य एष संप्रसादोऽस्माच्छरीरात् समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाऽभिनिष्पद्यत एष आत्मेति होवाच । छा० उ० (८.३,४.)॥ आकाशो वै नाम नामरूपयोर्निर्वहिता । छा० उ० ( ८.१४,१. ) ॥

ब्रह्मानें पापपुरुषाचें हनन केलें आहे असे त्याचे गुण प्रसिद्ध आहेत आणि या प्रसिद्धीची योग्यता भूताकाशाच्या प्रसिद्धीपेक्षा विशेष यावर मध्वाचार्य असें म्हणतात की दहर म्हणजे गगन त्या ठिकाणीं शोक नाहीं त्याच्या आत जें आहे त्याचा उपासना करावा असें प्रसिद्धच आहे म्हणून दहर आकाश म्हणजे विष्णु यावर वल्लभाचार्य असें म्हणतात कीं, प्रकरणावरून ज्या ज्या धर्मांचें निरूपण झालें आहे त्या त्या वरून ते सारे धर्म परब्रह्माचेच, ते धर्म जीवाचे नव्हत म्हणून दहर आकाश म्हणजे ब्रह्मच असें ठरें. या संबंधीं जीं उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें "दहर हें आत आकाश आहे" "नाम आणि रूप हीं आकाशावरच तरंगतात— त्याचा आश्रय आकाश" "अरे, हीं

translation of the Upanisad texts quoted 'Then that which is in the peri-spirit—the abode—the lotus—the Dabara' In it again there is an inner space, which is also Dahara." "Name and form float upon the æther—it is their support' "Well, all these existences spring from æther itself'

**१८. इतर ह्मणजे जीव, त्याचा ( वाक्यशेषांमध्यें ) विचार येतो ह्मणून तो जीव ( वर्णिला आहे ) असें ह्मटलें तर तसें नव्हे; कारण असंभव प्राप्त होतो.**

18. If it be said that the human spirit (is described), because its consideration accrues (by way of filling in the ellipsis), then not so; because (it involves) impossibility.

---

जीं सर्व भूत तीं आकाशापासूनच उत्पन्न होतात."

१८. सूत्रार्थ इतकाच कीं दहर आकाशाच्या ज्या धर्मांचें उपनिषदामध्यें निरूपण केलें आहे त्यांतील कांहीं धर्म जीवाच्या अंगीं आहेत म्हणून दहर-आकाशाचा अर्थ जीव असा करावा अशी कोणी शंका काढली. या शंकेचें समाधान असें कीं, साऱ्या उपनिषदाची एकवाक्यता केली असता ही शंका संभवतच नाहीं; ते धर्म जीवाचेच असें म्हणता येत नाहीं. म्हणून दहर-आकाश म्हणजे परब्रह्म असाच सिद्धांत. हा सिद्धांत प्रथम सूत्रीं केला आहे. परंतु आणखी कांहीं शंका निघतील त्यांचें निराकरण झालें पाहिजे म्हणून याच सिद्धांताचा पुनः उपन्यास केला आहे. असें शंकराचार्यांनीं म्हणणें आहे. या सूत्र-संबंधीं जीं उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें. "पुढें जी ही सुषुप्ति-अवस्था ज्याला (आहे) तो जीव. तो या संसारांतून जागा होऊन परज्योतिरूपाप्रत प्राप्त होऊन आपल्याच रूपास मिळतो. तो हा आत्मा असें तो म्हणाला" 'अरे खचित आकाश नामरूपास वाहतें"

18* Properties of the æther (Dahara Âkâsha) are described in the Upanisads, and some of these are found in the human spirit Hence some philosophers contend that æther signifies the human Spirit This contention is upset, when it is remembered that some of the properties of the æther are not to be found in the human spirit Hence the æther *is not* the human spirit, *because* it is impossible that the properties which the Supreme Spirit has, should be possessed by the human spirit The æther (Dahara Âkâsha) signifies the Supreme Spirit This is the sense of the sûtra This proposition is laid down in the first sûtra Shankarâchârya says that this sûtra seeks to remove such objections as may be raised against the proposition The following is the translation of the Upanisad texts quoted "Then he, who enjoys complete sleep, is the human spirit, who unites with the bright flame his own form after he is awakend from this world" "Then he said this is that spirit. Well, indeed, on the æther name and form float"

सूत्राणि.

उत्तराच्चेदाविर्भूतस्वरूपस्तु ॥ १९. ॥

भावार्थः । छांदोग्योपनिषदोऽष्टमेऽध्याये यः प्रजापतिसंवादस्तत्र जीवधर्मा. परब्रह्मधर्माश्च निर्दिष्टा इति यद् भाति तत्तु न परमार्थेन । किं तर्हि । जीवो निर्दिष्टः । स च न शारीरो जीव उपाधिविशिष्टः । कस्तर्हि । उपाधिरहित इति सूत्रार्थः ॥ तत्र शंकरः एवं शरीरात्मताया अनुपपत्तेर्न त इति पुनः पुनस्तमेव व्याख्येयत्वेनाकृष्य स्वप्नसुषुप्त्योपन्यासक्रमेण परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाऽभिनिष्पद्यत इति यदस्य पारमार्थिकं स्वरूपं परं ब्रह्म तद्रूपतयैनं जीवं व्याचष्टे न जैवेन रूपेण + + + अस्य च्छरीराद्यभिमानात् समुत्तिष्ठन् स एव कूटस्थनित्यदृक्स्वरूप आत्मा भवति + तदैव चास्य पारमार्थिकं स्वरूपं + + + प्राग् विवेकविज्ञानोत्पत्तेः शरीरेन्द्रियमनोबुद्धिविषयवेदनोपाधिभिरविविक्तमिव जीवस्य दृष्ट्यादि ज्योतिःस्वरूपं भवति । यथा शुद्धस्य स्फटिकस्य स्वाच्छ्यं शौक्ल्यं च स्वरूपं प्राग् विवेकग्रहणाद् रक्तनीलाद्युपाधिभिरविविक्तमिव भवति । प्रमाणजनितविवेकग्रहणात् तूत्तरकालीनः पराचीनस्फटिक स्वाच्छ्येन शौक्ल्येन च स्वेन रूपेणाऽभिनिष्पद्यत इत्युच्यते प्रागपि तथैव सत् + + + एक एव परमेश्वरः कूटस्थनित्यो विज्ञानधातुरविद्यया मायया मायाविवदनेकधा विभाव्यते नाऽन्यो विज्ञानधातुरस्तीति ॥ रामानुजस्तु पूर्वमनृततिरोहिताऽपहतपाप्मत्वादिगुणकस्वस्वरूपः पश्चाद् विमुक्तकर्मबंधः शरीरात् समुत्थितः परं ज्योतिरुपसंपन्न आविर्भूतस्वरूपः सन्नपहतपाप्मत्वादिगुणविशिष्टस्तत्र प्रजापतिवाक्येऽभिधीयते इति ॥ वल्लभः तत्र हि दिव्ये चक्षुषि

इतकें समजलें म्हणजे रामानुजाचा लेख लक्षात येण्यास बरें पडेल. आपल्या नेहमीच्या परिपाटीप्रमाणें मध्वाचार्य आपल्या सिद्धांतास पुराणाचा आधार देतात. या प्रसंगीं त्यांनी स्कंदपुराणांतील वाक्य घेतलें आहे. तें असें. "श्रेष्ठ जें तत्व, परब्रह्म, त्याची जितकी जितकी सेवा करावी तितकें तितकें सुख प्राप्त होतें. विष्णु सोडून बाकीच्यास अप्रकाश म्हणजे अज्ञान होण्याचा संभव आहे. आणि देवादिकांच्या अंगीं सामर्थ्य आहे. म्हणून त्या देवादिकांना उपासना किंवा यज्ञादि कर्में केलीं पाहिजेत असें विधान आहे." या मताविषयीं आम्हास असें सुचविलें पाहिजे कीं विष्णु तोच परमेश्वर देवादिक ते मनुष्याच्या वरील कोटींतील त्यांना ज्ञान विशेष आहे, सामर्थ्य विशेष आहे खरं; तथापि अज्ञान होण्याचा संभव आहे. म्हणून त्यांनीं यज्ञयागादि कर्में आणि उपासना करावी या मताप्रमाणें परमेश्वराचा अवतार होतो या मताचें आणि रोमन क्याथलिक मताचें साम्य आहे याचा वाचकांनीं विचार करावा यावर वल्लभाचार्य असें म्हणतात कीं वसु हे जे देव ते परब्रह्माचे अवयवच आहेत त्यांना भक्षणादि नाहींत बरें, असें नव्हे म्हटलें तर विरोध येतो तो कसा? वसूना प्रातःसवन अर्पण करावें याचा अर्थ देवाना तें प्रातःसवन अर्पण करावें, म्हणजे यज्ञ पुरुष परमेश्वराला तें अर्पण करावें मग वसु कोणी जीवविशेष आहेत असें म्हणून कसें चालेल? या कारणामुळे

The Supreme Spirit is always the supreme and first cause It is the Highest Person. After this explanation we believe that the statements of Râmânuja will be easily understood Madhvachârya, as is usual with him, quotes Purânas in support of his statements On this occasion he refers to the Skanda-purâna, the text from which is—the more one worships the Highest Spirit, the more happiness he obtains; but all except Visnu are likely to be affected by darkness or, ignorance. Gods and others possess power, therefore, they should worship other gods and perform sacrifices as well This is an injunction About this statement of Râmânuja we have to observe that by Visnu the Highest Person is meant The gods are only beings higher than men, and though they possess special knowledge and special powers, yet they are likely to be affected by ignorance, or to fall. Hence it is their duty to perform sacrifices or to worship According to this school, the Highest Personal God becomes incarnate. The reader may well compare these doctrines with those of the Roman Catholics, because there is considerable analogy between them Upon this Vallabhâchârya observes —gods like the Vasus are so many parts of the Supreme Spirit They are above food. A contradiction to this involves us in an absurdity. To say that the morning libation should be offered to Vasus, is to say that it should be offered to God—to Personal sacrifice Then it would not do to say that Vasus are higher celestial beings

हें जें छांदोग्य उपनिषदांतील वाक्य घेतलें आहे त्यामध्यें ब्रह्मविचारच आहे देवासारखी ज्याची उपासना करावयाची तो परब्रह्माचा अंश आहे तो आधिदैविक आहे वसु म्हणजे कोण ? निरनिराळ्या ग्रंथामध्यें यांनीं निरनिराळीं नावें आढळतात. सागर, (आप) ध्रुवनक्षत्र, वायु, अग्नि, प्रातःकाल (उषा), आणि तेज या वल्लभाच्या मतावर आमचें असें म्हणणें आहे. वल्लभमतें परब्रह्म म्हणजे शुद्ध आनंदराशि, प्रलयसमयीं हें परब्रह्मच शुद्ध अवशिष्ट राहतें उत्पत्ति होऊं लागली म्हणजे त्याचीं तीन रूपें प्रकाशमान होतात या तिहींमध्येंहि साक्षात् ब्रह्मानंद आहे. प्रथम शुद्ध ब्रह्म याच्या खालीं देव-कोटी त्यामध्यें आनंद आणि दुसरीं ऐश्वर्यें कमी आहेत कारण जीवन ते याच्या खालीं मनुष्य-कोटी मनुष्यामध्यें आनंद अतिशय कमी, आणि तो क्षणांत कमी जास्ती होतो इतका हा परब्रह्म आणि मनुष्य यांमधील आनंदाच्या तारतम्याविषयीं विचार आता परब्रह्म म्हणजे आनंद सत् आणि चित्, म्हणजे सच्चिदानंद त हा सत् आणि चित्, या दोन अंशाचा वल्लभमतें विचार व्हावयाचा आहे सत् म्हणजे प्रकृति आणि चित् म्हणजे पुरुष मग पुरुष आणि प्रकृति एकत्र होऊन जगत् आविर्भूत झालें जगत् नित्य ही सारी देवादि सृष्टि नित्य हा सारा ब्रह्मपरिणाम ब्रह्मपरिणामाचा निराभार झाला म्हणजे ब्रह्मरूप होतो आणि ब्रह्माचा परिणाम झाला की ब्रह्म आविर्भाव होतो म्हणजे

*The consequence of this is then* that all statements made in the Chhândogya-Upanisad in the course of the Brahmopanisad refer to the Supreme Spirit, direct parts of which are the gods to be worshipped—yes—the parts in which the Supreme Spirit predominates (Adhidaivika) Who are these gods called Vasus? In different works they are differently enumerated,—the Ocean (waters) the Polar Star, Air, Agni, Morning (Usâ), and Light Upon this statement of Vallabhacharya, we have to observe that according to him, the Supreme Spirit is a mass of pure delight When everything else is destroyed on the occasion of a mundane revolution the Supreme Spirit, pure and simple, remains On the occasion of the re-creation of the world it manifests itself in three forms, in which delight is directly to be seen. The first and the highest is the Supreme Spirit, abounding in pure delight, below it are the gods, who have delight and powers inferior to that of the Supreme Spirit, because they are mere beings created or manifested, below them are human beings, who possess little delight capable of decrease or increase in a moment This is the comparative scale of the degrees of delight as it is possessed by the Supreme Spirit, by gods and by human beings Now the Supreme Spirit is delight (Ânanda), existence (Sat), and knowledge (Chit) He is Sachchidânanda The Supreme Spirit as Delight is already explained The Existent and the Knowing—these two attributes of the Supreme Spirit are to be

जगत् उत्पन्न होतें. या सूत्रसंबंधानें जी उपनिषद्वाक्यें आलीं आहेत त्यांचें भाषांतर एणेंप्रमाणें. "पुढें देवांमधून ज्यानें ज्यानें तें ओळखलें तेंच तो झाला; तसेंच ऋषींमधून (ज्याने ज्यानें ते ओळखलें तेच तो झाला) तसेंच मनुष्यांमधून." "अरे, ते म्हणाले हरहर! तो आत्मा म्हणजे काय हे आम्हास कळावें अशी इच्छा आहे. ज्या आत्म्याला ओळखल्यापासून जीवास सर्व लोक प्राप्त होतात; त्याच्या सर्व कामना परिपूर्ण होतात; असें म्हणून देवांमधील इंद्र आणि असुरांमधील विरोचन हे दोघेजण बाहेर पडले" "हे मेधातिथीच्या मेंढ्या, (म्हणजे हे इन्द्रा असें संबोधन त्यास का दिलें? (कोणी एका प्रसंगी) कण्वाचा नातु, ज्याचें नाव मेधातिथि, ह्या मेधातिथीला इंद्रानें मेंढा होऊन उपटून नेलें." "आदित्य पुरुष होऊन त्यानें कुंतीशीं समागम केला." 'माती बोलली," "जलें बोललीं" "वायुदेवतेस अर्पण करायाचा पांढरा बोकड त्यानें मारावा. (त्यानें म्हणजे कोणी?) ज्याला ऐश्वर्याची इच्छा आहे त्याने वायु हे अतिशय जलद देवता आहे. म्हणून यज्ञभाग घेऊन वायुजवळ धावत (तो) जातो. आणि तो वायु याला ऐश्वर्याप्रत पोहोंचवितो." "ज्या देवतेस उद्देशून हवि हातामध्यें घेतला असेल, तो वषट्कार म्हणून त्या देवतेचें ध्यान करावें" "स्वाध्यायानें अध्ययन केलें असता इष्ट देवता प्राप्त होते." "पृथ्वी, आप, तेज, वायु, आणि आकाश या पांचांची धारणा (शरीराच्या पांच भागीं) केली

explained according to Vallabhâchârya The (*Sat*) or the Existent is the Prakriti or the essence of matter, and *Chit* or the Knowing is the Person. Thus the Prakriti and the Purusa together manifest the world The world or the universe is eternal. All the gods above are eternal. These are *all the Supreme Spirit* transformed When the Supreme Spirit, draws itself into itself, the whole universe or the phenomenal existence disappears By a transformation of the Supreme Spirit it manifests itself, and the universe or the phenomenal existence appears The following is the translation of the Upanisad-texts quoted in this connection.

Out of the gods he, that knew it became it himself In like manner out of the *Risis* (he, that knew it, became it himself) In like manner out of the human beings" "Ah! they said—we desire to know what the soul is From knowing the soul or the spirit, the human spirit attains to all regions, and has all his desires fulfilled—so saying Indra from among the gods and Virochana from among the Asuras, set out" "Oh thou ram of Medhatithi, (this is the way Indra was once addressed, and the cause of this is—once) the grandson of Kanva named Medhâtithi was carried away by Indra in the form of a ram" "The Sun assumed the form of man and joined Kunti in conjugal love' "The earth stated' 'The waters stated" "He, who desires prosperity ought to kill a white goat to be offered to the god Vâyu" "Well, Vâyu is an extremely swift deity. He, there-

असतां अणिमादि ऐश्वर्य प्राप्त होऊन त्या योग्याला रोग होत नाहीं, म्हातारपण येत नाहीं, दुःख प्राप्त होत नाहीं, योगापासून प्राप्त झालेलें शरीर त्याला मिळालेलें असतें म्हणून." (पूर्वी वर्णिलेले शरीराचे पांच भाग ते कोणते? तळव्यापासून गुडघ्यापर्यंत हा एक भाग, गुडघ्यापासून बेंबीपर्यंत दुसरा भाग, बेंबीपासून मानेपर्यंत तिसरा भाग, मानेपासून केसापर्यंत चवथा भाग, आणि त्यापासून ब्रह्मरंध्रापर्यंत पांचवा भाग.

fore, runs to Vâyu with a sacrificial portion, and this Vâyu grants him prosperity." "He ought to contemplate that Deity for whom he holds an oblation in his hand, and to whom he pronounces the sacrificial *form Vasat*." "One sees the desired deity by studying the Svâdhyâya" "The earth, the waters, the light, the air, and æther—when these are steadily contemplated in reference to the five parts of the human body, the Yogi obtains the powers of becoming gross or subtle and is not affected by any disease, does *not become old, does not become* sorry; because he has a body, which Yoga-contemplation secures. (What are the five parts of the human body *already* referred to? The one part is from the sole of the foot to the knees, another part is from the knees to the navel; the third part is from the navel to the neck; the fourth part is from the neck to the hair, and the fifth part is from the hair to the *Brahmarandhra*, the spiritual aperture in the crown of the head)"

सूत्राणि.

शुगस्य तदनादरश्रवणात् तदाद्रवणात् सूच्यते हि ॥ ३४ ॥

भावार्थः। कश्चित् पूर्वपक्षकारो ब्रवीति। यदि सर्वेषां मनुष्याणां देवानां च ब्रह्मविद्यायामधिकारस्तर्हि मनुष्यांतःपातित्वाच्छूद्राणामधिकारः स्यादिति प्राप्ते बादरायणो ब्रवीति। जानश्रुतेराख्यायिकायां शूद्रशब्दस्य यः प्रयोगः कृतः स तु योगतो न रूढितः। शुक् शोकः। जानश्रुतेः शोकः स्वानादरोक्त्या। तया च स दुद्राव। तेन शूद्रपदं सिध्यति। एतादृशं शूद्रपदं जानश्रुतिमुद्दिश्य ऋषिः प्रयुक्तवान्। वस्तुतस्तु जानश्रुतिर्न शूद्र इति छांदोग्योपनिषदाख्यायिकाया व्यवस्था ॥ तत्र तदाद्रवणाच् छुचमभिदुद्राव शुचा वाऽभिदुद्रुवे शुचा वा रैंकमभिदुद्रावेति शूद्रावयवार्थसंभवाद् रूढार्थस्य चाऽसंभवादिति शंकरः ॥ अतः शूद्रशब्देन विद्योपदेशयोग्यताख्यापनार्थं शोक एवाऽस्य सूचितो न चतुर्थवर्णत्वमिति रामानुजः ॥ तस्माच्छुचं प्रत्याद्रवणादेव शूद्रपदप्रयोगो न जातिशूद्रवाचीति वल्लभः ॥ शुग् द्र एव शूद्रो रूद्र इतिवदिति मध्वः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

तस्माच्छूद्रो यज्ञेऽनवक्लृप्तः। तै० सं० (७.१,१,६.) ॥ कं वर एनमेतत् संतं सयुग्वानमिव रैंकमात्थेति। + + + अह हारे त्वा शूद्र तवैव सह गोभिरस्त्विति। छां० उ० (४.२,३.) ॥

**३४. त्याचा अनादर वर्णिला आहे आणि त्याचें पलायन (वर्णिलें) आहे; ह्मणून ह्याचा शोक असें निष्पन्न होतें.**

**34. His sorrow is suggested; because of the description of disrespect to him, and because of his flight.**

---

३४. कोणी पूर्वपक्षकार असें म्हणतो कीं सर्व मनुष्यांना आणि देवांना जर ब्रह्मविद्येचा अधिकार आहे, तर मनुष्य म्हटलें कीं त्यामध्यें शूद्रहि आले. मग शूद्रालाहि अधिकार आहे असें प्राप्त झालें. या पूर्वपक्षाचें बादरायण या सूत्रीं खंडन करतात असें भाष्यकार म्हणतात. आणि या धोरणानेंच या सूत्रावर व्याख्या करतात. परंतु चारीहि भाष्यकारांचें म्हणणें आम्हास प्रामाणिक दिसत नाहीं. ज्यास आपली आत्मस्थिति पाहून शोक झाला, ज्याला संसाराविषयीं अनादर उत्पन्न झाला आहे, आणि ज्यानें संसारापासून पलायन केलें आहे, त्याला अधिकार, असें मागें जें निरूपण झालें आहे त्यावरून शूद्राधिकार सुचविला जातो. 'हि' पद सूत्रांत आहे त्याचा अर्थ 'कारण' असा करावा. मागील सूत्रांत जो वादविवाद झाला आहे त्या वादविवादाचा उपसंहार या सूत्रांत केला आहे. आणि असा सूत्रांत सूत्र लावण्यास अडचण कोणतीच नाहीं. कारण चोखामेळ्यासारखे ब्रह्मज्ञानी होऊन संतमालिकेमध्यें मोडताहेत. ब्राह्मणधर्माचा उत्कर्ष करणें आणि बौद्धांचें खंडन करणें अशा वेळीं जी व्यवस्था करावी

34. An opponent states — if all men and gods are entitled to the knowledge of the Supreme Spirit, then Shûdras, being men, are necessarily included. The conclusion is—the Shûdra is entitled to the knowledge of the Supreme Spirit. These statements of the opponent, Bâdarâyana seeks to refute in this sûtra. Commentators develop this refutation. But we find it difficult to accept the conclusion of all the four commentators. He, who was distressed at the condition of his soul, in whom disregard for the world was produced, and who fled from the world, has a title. All this is suggested by what has already been stated. The term *hi* is used in the sûtra. It means *because*. The sûtra under examination gives the summary of the controversy in the preceding sûtras. Thus the sûtra can be properly interpreted and adjusted, because good men like Chokhâmelâ knew the secret of the knowledge of Brahma, and are known to be saints. The social adjustments, made at the time of the Brahmanical revival and of the decline of the Buddhists, are not now recognized throughout India. On the contrary, it is now established that all castes have a title to the

लागली ती व्यवस्था आज सर्व भरतखंडभर जनास पटत नाहीं. ब्रह्मज्ञानाचा अधिकार सर्वांस आहे. अशीच सर्व जनांची समजूत आहे. आमच्या संप्रदायाप्रमाणें चारहि भाष्यकारांच्या मतांचें आम्ही निरूपण करतों. यावर शंकराचार्य असें म्हणतात कीं छांदोग्य उपनिषदामध्यें जानश्रुतीची कथा आहे त्या कथेचें अनुसंधान या सूत्रीं केलें आहे. ती कथा अशी " उन्हाळ्यामध्यें जानश्रुति नावाचा राजा वाड्याच्या गच्चीवर निजला होता. त्यानें अन्नसंतर्पण फार केलें होतें म्हणून ऋषिजन संतुष्ट होऊन हंसाचें रूप धारण करून या राजाचें कांहीं कल्याण करावें म्हणून त्या तटमजल्यांत येऊन बसले. सर्वांच्या मागें जो हंस होता तो सर्वांतील पुढील हंसास म्हणाला —अरे, का पहात नाहींस या जानश्रुतीचें तेज स्वर्गास व्यापून अवशिष्ट राहिलें आहे ? तें तुला जाळून टाकील पुढें जाऊं नको. त्याला सर्वांतील पुढील हंसानें उत्तर दिलें कीं कोणी एक विद्याहीन, नीच, असा जो हा जानश्रुति राजा त्याला गाडीपाशीं निजलेला जो रैक त्याची उपमा कशा देतोस ? आणि हें काय बोललास ? रैक जो आत्मज्ञानी त्याचें असें तेज, या आत्मज्ञानहीन राजाचें तें तेज कोठलें ? असल्या हंसानें म्हणण्याचा अभिप्राय काय ? हा राजा त्या गाडीवरून रैकाला ओळखून काढील आणि त्याच्या पाशीं जाईल मग राजा पुढें जागा झाला आणि त्यानें द्वारपाळास म्हटलें, अरे गड्या, एव्हढा

knowledge of the Supreme Spirit (Brahma vidya). At least this is universally believed. As is usual with us, we shall lay before the reader explanations of the sûtra by all commentators. Shankarâchârya observes —there is the story of Jânashruti in the Chhândogya Upanisad. The story is referred to in the sûtra. It is as follows " On a day in summer, a king of the name of Janashruti slept in his turret. Because he had dispensed large quantities of food to the poor, the Risis assumed the form of swans, and appeared on the first story that the king might be benefited. A swan in the rear addressed a swan in the van " Why do you not see how the glory of Janashruti fills heaven itself and it is not yet exhausted ? " Take care lest you be consumed by it. Do not approach him.' The swan in the van thus replied " How do you compare king Jânashruti, ignorant and low, to Raınka lying near a cart, and what do you say ? Raınka has such a glory—Raınka, who possesses spiritual knowledge Jânashruti, who is innocent of all spiritual knowledge, cannot possess it. What is the purpose of this speech of the swan? That the king may go to the cart finds out Saint Raınka and approach him.' (All this is heard by the king in a dream) When awakened, he called to a warder. Well, who is this Raınka so famous! Go and find him out.' The warder searched for him but could not find him. He returned and said to the king that he could not find him. Upon this the king told him to search

सोढा हा रैक कोण आहे ? जा, त्याला हुडकून काढ इकडे तिकडे द्वारपालानें शाध केला परंतु रैक त्याला सापडला नाहीं. मग मला रैक सापडत नाहीं म्हणून तो राजास म्हणू लागला पुन ज्या ठिकाणीं ब्राह्मण वास करतात त्या ठिकाणीं याचा शोध कर मग पुन द्वारपालान शोध केला आणि त्याला रैक भेटला तो रैक आपला गाडीला आग खाजवीत बसला होता मग का हो दुर्दीन रैक का असें द्वारपालानें त्यास विचारलें तो म्हणाला होय मीच रैक मग रैकाचा शोध लागला असे राजापाशीं येऊन द्वारपाळानें सागितलें पुढ राजानें तो दरिद्री आहे असें समजून पुष्कळ द्रव्य, पुष्कळ गायी, आणि एक खेचरानी गाडी इतकीं घेतली आणि राजा रैकास देण्याकरता गला, आणि म्हणाला, हे रैक, हें सारें द्रव्य घ आणि ज्या देवतेची तू उपासना करतोस ती देवता कोण हें मला साग त्याला रैकानें उत्तर दिल अरे शूद्रा ह्या गायी तुझ्या तुज पाशी असू द पुन पुष्कळ द्रव्य घेऊन, अधिक गायी घऊन, तीच खेचराची गाडी घेऊन आणि आपली एक मुलगी घऊन राजा रैकाकडे गेला आणि त्याला म्हणाला ह द्रव्य, ह्या गायी ही गाडी, आणि ही मुलगी आणि ज्यात बसला आहेस तो गाव, हीं सारी घे आणि मला ती विद्या शिकीव पुढें त्या रैकानें तें द्रव्य स्वीकारलें आणि राजकन्येच्या मुखास हात लाविला आणि म्हणाला हे शूद्र, ह्या मुखानें तू मजशीं बोलशील

for Rainka in a place where Brahmanas generally resided Upon this, the warder made a search and found Rainka—Rainka who was scratching his back against the cart. The warder asked him if he was Rainka. Rainka said that he was he The warder returned to the king and said that Rainka was discovered The king knew that Rainka was extremely poor, and taking with him for gifts to Rainka an immense quantity of money, thousands of cows and a cart to which mules were yoked, approached him, and said to him—*oh Rainka, take all this wealth, and tell me who the god is whom you worship* Rainka replied—oh Shûdra, let these cows remain with you as they are The king went to Rainka the second time with more money, with more cows the same cart to which mules were yoked, and with one of his daughters and said—Oh Rainka, teach me that science, take all this money, these cows this cart, this daughter, and even the village in which you are Rainka upon this, accepted the gifts and touching the face of the daughter of the king said—"oh Shudra you will talk with me through this mouth The places where all this happened, are still known as Painka Parna They are situated in a country called Mahâvrisa The science which Rainka thus explained to Jânashruti, is known as Sanvarga vidyâ the essence of which is that air is principal among the gods and breath is principal among the senses The question is—was Jânashruti a real Shûdra or is he referred to in the story

ज्या स्थळीं ही वार्ता घडली त्या स्थळाषी अद्यून रैकपर्ण अशी प्रसिद्धि आहे आणि ती स्थळें महावृष देशामध्यें आहेत" मग त्या रैकानें त्या जानश्रुति राजास जी विद्या सांगितली तिचें नांव सवर्ग-विद्या तिचें मुख्य तत्त्व इतकेंच की देवामध्यें वायु मुख्य, आणि इंद्रियामध्यें प्राण मुख्य ही कथा घेऊन हिज मध्यें जो शूद्र शब्दाचा प्रयोग केला आहे तो केवळ लाक्षणिक आहे शूद्र म्हणजे खरा शूद्र-जातीचा मनुष्य नव्हे, शूद्र म्हणजे ज्याला शोक झाला (शुक्) आणि म्हणून जो पळाला (द्र) असा तो जानश्रुति, म्हणून रैक त्याला शूद्र असें म्हणाला वास्तविक जानश्रुति शूद्र नव्हता अशा रीतीनें या कथेची शंकराचार्य व्यवस्था करतात रामानुज याच कथेची अशी व्यवस्था करतात कीं शूद्र शब्दाचा एव्हढाच अर्थ की तो राजा अज्ञान होता आणि विज्ञान प्राप्त होण्याकरता जो शोक लागतो तो त्याच्या अंगीं होता. म्हणून शूद्र म्हणजे खरोखर शूद्र नव्हे यावर वल्लभ असें म्हणतात कीं शोक झाला आणि पळाला असा शूद्र शब्दाचा अर्थ. शूद्र म्हणजे शूद्रजाति नव्हे. मध्वाचार्य म्हणतात—रुद्र शब्दाची जशी व्युत्पत्ति तशीच शुक् आणि द्र यापासून शूद्रशब्दाची व्युत्पत्ति या सबंधीं उपनिषद्वाक्यांचें भाषांतर एणप्रमाणें "म्हणून शूद्राची यज्ञामध्यें योजना नाहीं" "अरे गाडीपाशीं बसलेल्या रैकाची उपमा देऊन आणि ह्या विषयीं असें बोलतोस + + + गायी

merely by way of metonymy? The Shûdra is not a real Shûdra, but one who is afflicted (shuk) and who fled (dra) (Shuk+dra= Shûdra) Such was Jânashruti and, therefore, Raink̄a addressed him as Shûdra, while he was not a real Shûdra. This is the way Shankarâcharya explains away this story Râmânuja observes —the term *Shûdra* used in the story simply signifies that the king was ignorant, and felt that mental pain, which precedes the acquisition of knowledge. Hence a real Shûdra is not meant in the story Vallabha remarks —the term *Shûdra* consisting of *Shuk* and *dra*, means one afflicted and flying, and not Shûdra by caste Madhvachârya observes —Shûdra is to be derived as the word Rudra is derived The following is the translation of the Upanisad texts quoted "Hence a Shûdra is not employed in a sacrifice" 'Well, comparing to Rainka sitting near a cart, do you say this about him? + + + He said—oh Shûdra, let these cows and this wealth remain with you' This story of Ramka or Raikka is given in the Chhândogya-Upanisad (IV 1 1) The examination of the story will show to the reader how it fits in with the sûtra

सूत्राणि.

क्षत्रियत्वगतेश्चोत्तरत्र चैत्ररथेन लिंगात् ॥ ३५ ॥

भावार्थः । जानश्रुतेः क्षत्रियत्वं सिध्यति । तेन न स शूद्रः । कथं सिध्यति । आख्यायिकायामुत्तरत्र चैत्ररथेन समं जानश्रुतेर्वर्णनात् । आख्यायिकायां यथा चैत्ररथस्तथा जानश्रुतिरिति निरूपणाद् जानश्रुतिर्न शूद्रः ॥ तत्र समानाऽन्वययाजिनां च प्रायेण समानाऽन्वया याजका भवंति । तस्माच्चैत्ररथिर्नामैकः क्षत्रपतिरजायत इति च क्षत्रजातिलावगमात् क्षत्रियत्वमस्याऽवगंतव्यमिति शंकरः ॥ रामानुजस्तु सूत्रं विभज्योपक्रमोपसंहाराभ्यां जानश्रुतेः क्षत्रियत्वं स्थापयति ॥ तेन प्रकृतेप्येतौ गुरुशिष्यौ ब्राह्मणक्षत्रियावेवेति गम्यते । तस्मान् न जातिशूद्रः संवर्गविद्यायामधिकारीति वल्लभः ॥ यत्र वेदो रथस्तत्र न वेदो यत्र नो रथ इति च ब्रह्मवैवर्ते इति मध्वः ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अथ ह शौनकं च कापेयमभिप्रतारिणं च काक्षसेनिं परिविष्यमाणौ ब्रह्मचारी बिभिक्षे । छां० उ० ( ४.३,५. ) ॥ एतेन वै चैत्ररथं कापेया अयाजयन् ॥ तस्माच्चैत्ररथिर्नामैकः क्षत्रपतिरजायत ॥

---

आणि द्रव्य, हे शूद्र, तुझें तुला असो असें म्हणाला." ही सारी रैकाची किंवा रैकानी कथा छा. उ. (४. १ १.) या ठिकाणीं आहे. त्याच्या कथेचें चिंतन केल्यावर सूत्रार्थाची आणि तिची कशी जुळणी बसते हें वाचकाच्या लक्षात येईल

**३५. कारण (जानश्रुति) क्षत्रिय असें कळतें, कारण (गोष्टीमध्यें) पुढें चैत्र-रथावरून असें सिद्ध होतें.**

**35 Because it is seen that (Jânashruti was) a Ksatriya, because of there being in the latter place an inference from Chaitra-ratha**

३५ जानश्रुतीची जशी गोष्ट उपनिषदात आली आहे, तशीच आम्ही वरील सूत्रीं सांगितली आहे. त्या गोष्टीवरूनच जानश्रुति क्षत्रिय होता आणि शूद्र नव्हता, असें सिद्ध होतें कारण जानश्रुतीचें आणि चैत्ररथाचें मिळून वर्णन झालें आहे. म्हणजे ज्या संबधानें जानश्रुतीचें वर्णन झाल आहे त्याच संबधानें चैत्ररथाचें वर्णन झालें आहे या वर्णनास शंकराचार्यांनी एक न्याय लावला आहे तो असा दोन पुरुषाचे आजे जर एक कालीं असल-एक यज्ञ करणारा आणि एक यज्ञ करविणारा-तर त्या दोन पुरुषाचे नातूहि एक कालीं असतात. आणि त्यामध्यें एक यज्ञ करणारा आणि एक यज्ञ करविणारा असाच संबध असतो चैत्ररथ क्षत्रिय होता, कारण वर्णन असें आहे कीं चैत्ररथि नावाचा एक क्षत्रिय उत्पन्न झाला चैत्ररथि क्षत्रिय म्हणून जानश्रुतिहि क्षत्रिय यावर रामानुज असें म्हणतात कीं, या सूत्राचे दोन भाग करावेत आणि उपक्रम आणि उपसहार याकडे लक्ष दिलें असता जानश्रुति क्षत्रिय होता असें सिद्ध होतें, कारण "तो आपल्या सारथ्याला बोलला, त्याच्या पाशीं पुष्कळ द्रव्य होतें, पुष्कळ गायी होत्या," अशा

35 We have already narrated the story of Jânashruti as it is given in the Upanisad It shows that Jânashruti was a Ksatriya and not a Shûdra, because Jânashruti and Chaitraratha are mentioned together, and thus in the same relationship Shankarâchârya tests their description by a maxim It is thus—if the grand-fathers of two persons be contemporary, one a sacrificer and the other assisting at a sacrifice their grand-children also are contemporary, one a sacrificer and the other assisting at a sacrifice Thus the relationship between the two is not changed Chaitra ratha was a Ksatriya, because Chaitra rathi a grandson of Chaitra-ratha is mentioned as Ksatriya, because Chaitra-rathi is a Ksatriya, Janashruti is a Ksatriya. Pâmânuja observes —the sûtra consists of two parts, the commencement and the end of the book being considered, Janashruti was a Ksatriya, because he is said to have a coachman, whom he addressed and because he is described to have possessed immense wealth and many cows Vallabhâcharya observes—the story of Jânashruti shows that Rainka was a Brahmana, and that Jânashruti was a Ksatriya The conclusion is—a Shûdra by caste has no title to the knowledge of Sanvarga-vidya already described

सूत्राणि.

संस्कारपरामर्शात् तदभावाऽभिलापाच ॥ ३६ ॥

भावार्थ. । विद्यासंबंधेनोपनयनादिसंस्कारा विहिताः । शूद्रसंबंधेन तेषां निषेध । तस्माच्छूद्रस्य न ब्रह्मविद्यायामधिकारः ॥ तत्र न शूद्रस्याऽधिकारो यद् विद्याप्रदेशेषूपनयनादय. संस्कारा· परामृश्यते । + + + शूद्रस्य च संस्काराऽभावोऽभिलप्यते इति शंकर.॥मध्ववल्लभरामानुजैर्विशेषतः सूत्रं न निरूपितं ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

• (त होपनिन्ये) अधीहि भगव इति होपससाद । छा० उ० (७.१,१.) ॥ सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकाम· सौर्यायणी च गार्ग्य. कौशल्यश्चाश्वलायनो भार्गवो वैदर्भि. कबंधी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठा परं ब्रह्माऽन्वेषमाणा एष ह वै तत् सर्वं वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवंत पिप्पलादमुपसन्ना· । प्र० उ० (१.१.) ॥ शूद्रश्चतुर्थो वर्ण एकजाति ॥ स्मृ० ॥ न शूद्रे पातकं किंचिन् न च संस्कारमर्हति ॥

तदभावनिर्धारणे च प्रवृत्तेः ॥ ३७ ॥

भावार्थ । यद्यपि जाबालः स्वगोत्राऽनभिज्ञः तथापि तस्मै ब्रह्मविद्यामुपदिदेश । एतस्माद् गौतमाचरणाद् ब्रह्मविद्यायां शूद्रस्याऽनधिकारो निश्चीयते ॥ तत्र यत् सत्यवचनेन शूद्रत्वाऽभावे निर्धारिते जाबालं गौतम उपनेतुमनुशासितुं च प्रवृत्त इति शंकरः ॥ इतरेषां मतं तु समान ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

नैतदब्राह्मणो विवक्तुमर्हति समिधं सोम्याहरोप त्वा नेष्ये न सत्याद्गाः । छा० उ० (४.४,५.) ॥

३६. कारण (ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांच्या संबंधानें) संस्कार सांगितले आहेत; आणि (शूद्राला) संस्कार नाहींत; असें सांगितलें आहे.

36. Because observances are prescribed in the case of a Brâhmana, Ksatriya and Vaishya, and not in the case of a Shûdra.

३७. शूद्र नव्हे असा निश्चय प्रवृत्तिवरून होतो.

37. (That he was) not a Shûdra, is determined by the conduct (of Goutama).

---

प्रकारचें वर्णन त्याचें आहे; म्हणून तो क्षत्रिय होता असें सिद्ध होतें यावर वल्लभाचार्य असें म्हणतात कीं जानश्रुतीच्या गोष्टीवरून रैक ब्राह्मण होता आणि जानश्रुति क्षत्रिय होता असें सिद्ध होतें म्हणून जातिशूद्राला सवर्ग-विद्येचा अधिकार नाहीं. यावर मध्वाचार्यांनीं ब्रह्मवैवर्त पुराणातील एक वाक्य घेतलें आहे तें असें. "ज्याला वेदाचा अधिकार त्याला रथाचा अधिकार ज्याला वेदाचा अधिकार नाहीं त्याला रथाचा अधिकार नाहीं" या संबंधीं उपनिषद्वाक्याचें पुढील भाषांतर. "पुढें, रे, कपि-गोत्रातील शौनक आणि कक्षसेनाचा मुलगा अभिप्रतारी याचीं पानें मांडलीं आहेत, तों एक ब्रह्मचारी भिक्षेस आला." "कपि-गोत्रातील जे कापेय त्या ब्राह्मणानीं चैत्ररथाकडून हा यज्ञ करविला." "म्हणून चैत्ररथ नावाचा एक क्षत्रपति उत्पन्न झाला."

३६ ज्याला वेदादि विद्या संपादन करण्याची आहे त्याजवर उपनयनादि

Madhvâchârya quotes a text from the Brahma-vaivarta purâna. It is this "He, who has a title to the Veda, has a title to a car. He, who has no title to the Veda, has no title to a car." The following is the translation of the Upanisad texts quoted "Well then, Shounaka belonging to the Gotra *Kapi* and Abhipratâri, son of Kaksasena, were about to sit to dinner, when a celibate came and asked for alms." "The Brâhmanas belonging to the clan (Gotra) Kapi, caused Chaitra-ratha to perform a sacrifice" "*Therefore Chaitra-ratha, lord of* a Ksatra, (Ksatra-pati or satrap) was born"

36 He, who has to acquire the knowledge of the Veda, must be invested with the sacred thread, and it is distinctly prescribed that such operations, as the investiture of the sacred thread, must not be *performed* upon a Shûdra A Shûdra, therefore, has no title to the knowledge of Brahma This is the sense of the sûtra Upon this Shankarâchârya observes.—

संस्कार केले पाहिजेत आणि असे उपनयनादि संस्कार शूद्रावर करू नयेत असा निषेध आहे, म्हणून शूद्रास ब्रह्मविद्येचा अधिकार नाहीं इतका सूत्रार्थ यावर शंकराचार्य म्हणतात – ज्या विद्येला उपनयनादि संस्कार लागतात, त्या विद्येचा शूद्राला अधिकार नाहीं आणि शूद्रावर संस्कार करू नयेत असा निषेध आहे रामानुज, वल्लभ, आणि मध्व, या सूत्रावर विशेष लिहीत नाहींत या संबंधी उपनिषद्वाक्यांचें पुढील भाषांतर "त्याचें उपनयन केलें, आणि हे भगवान्, आम्हास शिकीव म्हणून तो जवळ जाऊन बसला" "सुकेश नावाचा आणि भारद्वाज-गोत्राचा, सत्यकाम नावाचा आणि शिबि-गोत्राचा, सौर्यायणी नावाचा आणि गर्ग-गोत्राचा, कौशल्य नावाचा आणि आश्वल गोत्राचा, भृगुचा मुलगा आणि विदर्भ देशांत राहणारा, कबंधीनावाचा आणि कताच्या गोत्राचा, अशी ऋषि मंडळी ब्रह्मपर, ब्रह्मनिष्ठ, परब्रह्माचा शोध लावणारी, अरे, हा सर्व आम्हास सांगल अशी म्हणाली आणि हातांत समिधा घेऊन भगवान् "पिप्पलाद याकडे गेली" "शूद्र हा चवथा वर्ण आहे आणि ही एक जाति आहे (हिला उपनयन नाहीं)" 'शूद्राला पाप म्हणून नाहीं आणि शूद्राला संस्काराचा अधिकार नाहीं"

३७ या सूत्राच्या संबधानें जाबालाच्या गोष्टीचें अनुसंधान केलें आहे ती गोष्ट अशी "सत्यकाम नावाचा जाबाल असा कोणीएक पुरुष होता त्याची आई

Shûdras are not entitled to that knowledge which requires the previous investiture of the sacred thread, and it is distinctly stated that such operations should not be performed upon a Shûdra. Râmanuja, Vallabha, and Madhva do not offer special comments on this sûtra. The following is the translation of the Upanisad texts quoted "He was invested with the sacred thread and he sat down near (a preceptor) saying oh lord, teach me." Sukesha of the clan of Bhâradvâja, Satyakama of the clan of Shibi, Souryayani of the clan of Garga Koushalya of the clan of Âshvala, a son of Bhrigu residing in the country of Vidarbha, Kabandhi of the clan of Kata— these Risis saying—well, this (teacher) will explain all to us—approached lord Pippalada with sacred fuel (Samidha) in their hands, inquiring about Brahma, devoted to Brahma intent upon Brahma" "The Shûdra is the fourth colour and is a caste by itself (not entitled to the investiture of the sacred thread) A Shudra knows no sin a Shûdra is not entitled to religious observances

37 The story of Jâbâla is referred to in this sûtra. There was a man of the name of Satyakâma because his mother was called Jabâlâ, he was called Jabâla. Jâbala approached his mother and said—mother, entering into the state of Brahmacharya, I will stay with a preceptor, then tell me what my clan is She replied—I do not know your clan. You were born, when I was young and had to serve many persons, and to perform much busi

जबाला म्हणून त्याला जाबाल म्हणत जाबाल आपल्या आईकडे जाऊन तिला म्हणाला–आई, मी ब्रह्मचर्य धारण करून आचार्यांच्या घरीं वास करणार. म्हणून माझें गोत्र काय तें मला सांग ती म्हणाली–अरे, तुझें गोत्र काय, हें मला ठाऊक नाहीं तरुण मी असताना पुष्कळांची सेवा करणारी आणि पुष्कळ खटपट करणारी, त्या वेळेस तूं झालास म्हणून तुझें गोत्र काय, हें मला ठाऊक नाहीं माझें नाव जबाला आणि तुझें नाव सत्यकाम सत्यकाम जाबाल मी असे तेथें म्हण हरिद्रुमानाचा मुलगा गौतम याजकडे तो गेला आणि म्हणाला आपल्यापाशीं राहून मी ब्रह्मचर्य करीन आपल्यापाशीं मला राहू द्या तो गौतम त्या जाबालाला म्हणाला, अरे बाबा, तुझें गोत्र काय? तो जाबाल म्हणाला अहो माझें गोत्र काय हें मला ठाऊक नाहीं हें मी आईला विचारतें तिनें मला असें उत्तर दिलें कीं तरुण मी असताना पुष्कळांची सेवा करणारी आणि पुष्कळ खटपट करणारी त्या वेळेस तूं झालास म्हणून तुझें गोत्र काय हें मला ठाऊक नाहीं माझें नाव जबाला आणि तुझें नाव सत्यकाम म्हणून अहो सत्यकाम मी जबालेचा पुत्र आहें म्हणून गौतम त्याला म्हणाला जो अब्राह्मण तो असें बोलत नाहीं अरे बाबा तू सत्यापासून ढळला नाहीस म्हणून तू समिधा आण, मी तुझें उपनयन करीन असें म्हणून त्याचें उपनयन करून आणि त्याच्या स्वाधीन रो-

ness I, therefore, do not know what your clan is My name is Jabâla and your name is Satya kama Go and say then that you are Satyakâma son of Jabâlâ He then went to Goutama son of Haridruman and said—I will stay with you and practise Brahmacharya (I will study) Let me stay with you Goutama said to Jâbâla—boy, what is your clan? Jabala replied—I do not know what my Gotra is I asked my mother about it, and she thus replied— when young I had much to do and to serve many persons you were born then I do not know what your clan is I am named Jabâlâ, and you are named Satyakâma I am therefore Satyakâma son of Jabalâ. Then Goutama said to him—he, who is not a Brâhmana does not talk in this way you have not fallen from truth therefore, bring sacrificial fuel (Samidha), and I will invest you with the sacred thread. This said he was invested with the sacred thread Being put in charge of four hundred lean cows he was told to tend them When the cows were about to go out he was told not to return home to the hermitage till the cows had multiplied and become a thousand For some years Jâbala stayed in the forest and the cows had become a thousand. Then his preceptor explained to him the Brahma-vidya. This is the story on which the sûtra is based Though Jabâla did not know his clan, yet Goutama explained to him the Brahma-vidyâ This conduct of Goutama proves that the Shûdras have no title to the knowledge of Brahma vidyâ Shankara

सूत्राणि.

श्रवणाऽध्ययनाऽर्थप्रतिषेधात् स्मृतेश्च ॥ ३८ ॥

भावार्थः । वेदस्य श्रवणमध्ययनमर्थविचारश्च शूद्रैर्न करणीयः । कुतः । स्मृतौ प्रतिषेधादिति सूत्रार्थः ॥ तत्र शंकरः पूर्वकृतसंस्कारवशाद् विदुरधर्मव्याधप्रभृतीनां ज्ञानोत्पत्तिस्तेषां न शक्यते फलप्राप्तिः प्रतिबद्धुं । ज्ञानस्यैकांतिकफलत्वात् । श्रावयेच्चतुरो वर्णानिति चेतिहासपुराणाऽधिगमे चातुर्वर्ण्याऽधिकारस्मरणात् । वेदपूर्वकस्तु नास्त्यधिकारः शूद्राणामिति स्थितमिति शंकरः ॥ भवभयभीतानां सांख्यादय एव प्रत्यक्षानुमानाभ्यां वस्तुनिरूपणं कुर्वंतः प्रत्यक्षाऽनुमानपूर्वमुमुक्षुतां जनयंति। मुमुक्षायां जातायां प्रत्यक्षाऽनुमानाभ्यामेव विविक्तस्वभावाभ्यां नित्यशुद्धस्वप्रकाशाऽद्वितीयकूटस्थचैतन्यमेव सदन्यत् सर्वं तस्मिन्नध्यस्तमिति सुविवेचनं । + + + यथोक्तया नीत्या शूद्रादेरनधिकार उपपद्यते इति रामानुजः ॥ स्मार्तपौराणिकज्ञानादौ तु कारणवशेन शूद्रयोनिगतानां महतामधिकारः । तत्रापि न कर्म जातिशूद्राणां । तस्मान् नास्ति वैदिके क्वचिदपि शूद्राधिकार इति स्थितमिति वल्लभः ॥ विदुरादीनां तूत्पन्नज्ञानत्वान् न कश्चिद् विशेष इति मध्व ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

अथाऽस्य वेदमुपशृण्वतस्त्रपुजतुभ्यां श्रोत्रप्रतिपूरणं ॥ पद्यु ह वा एतत् श्मशानं यच्छूद्रस्तस्माच्छूद्रसमीपे नाऽध्येतव्यं ॥ भवति चोच्चारणे जिह्वाच्छेदो धारणे शरीरभेदः ॥ न शूद्राय मतिं दद्यात् ॥ द्विजातीनामध्ययनमिज्या दानमिति ॥ श्रावयेच्चतुरो वर्णान् ॥

**३८. कारण स्मृतीमध्यें (वेदाचें) श्रवण, अध्ययन, अर्थ (करण्याचा शूद्राना) निषेध आहे.**

**38. In the Smritis the right of hearing and studying the Vedas is denied to the Shûdras.**

हक्या चारशें गायी केल्या आणि त्याला म्हणाला ह्या गायी वळ. बाहेर गायी जेव्हां पडूं लागल्या, तेव्हा तो त्याला म्हणाला–हजार झाल्या वाचून तू परत येऊ नकोस. काही वर्षेपर्यंत जाबालानें प्रयास केला आणि त्या गायी हजार झाल्या. पुढें गुरुने त्याला ब्रह्मविद्या शिकविली." ह्या गोष्टीचे अनुसंधान करून वरील सूत्र रचले आहे. जरी जाबालाला आपले गोत्र ठाऊक नव्हते, तरी गुरूनें त्याला ब्रह्मविद्या शिकविली. इत्यादि जें गौतमाचें आचरण त्यावरून असें सिद्ध होतें की शूद्राना ब्रह्मविद्येचा अधिकार नाही. यावर शंकराचार्य असे म्हणतात कीं जाबाल सत्य बोलला म्हणून तो शूद्र नव्हे. म्हणून गौतमानें जाबालाचें उपनयन केले, आणि त्यास शिकविण्यास प्रवृत्त झाला. दुसऱ्या भाष्यकाराची मतें अशीच आहेत. वरील कथेपैकीं मुख्य मुद्याचे वाक्य पुढील आहे; आणि त्यावर भाष्यकाराचा कटाक्ष आहे. ते वाक्य असें. "म्हणून गौतम त्याला म्हणाला कीं जो अब्राह्मण तो असें बोलत नाहीं. अरे बाबा, तूं सत्यापासून सुटला नाहींस, म्हणून तू समिधा आण, मी तुझें उपनयन करीन."

३८. स्मृति म्हणून जे प्रसिद्ध ग्रंथ आहेत त्यांमध्यें शूद्रानी वेदाचें अध्ययन



chârya observes —Jâbâla spoke the truth, and, therefore, he was not a Shûdra, and, therefore, Goutama invested him with the sacred thread, and made up his mind to instruct him. All the commentators offer similar remarks on this sûtra. The Upanisad text, on which all commentators *lay stress, is the following.* "Therefore, Goutama said to him—he, who is not a Brâhmana, does not thus speak. Boy, thou hast not fallen from truth; then bring me sacrificial fuel and I will invest you with the sacred thread"

38. The works called Smritis are well known. They declare that the Shûdra should not study the Vedas, should not hear them, and should not think of what they teach, because he has no title to their knowledge. This is the sense of the sûtra On *this Shankarâchârya observes*:— great men like Vidura and Dharma-vyâdha acquired knowledge, and knowledge produced its own fruit, because the fruit of knowledge invariably follows it. It is not proper to state that men like Vidura and Dharma-vyâdha acquired knowledge and thus attained to Brahma But the knowledge that they obtained was itself a fruit of what they had done and the influences brought to bear upon them in their former lives But the Itihâsa

करू नये, श्रवण करू नये, अर्थविचार करू नये, असा निषेध आहे. म्हणून शूद्रांना वेदाचा अधिकार नाहीं इतका सूत्रार्थ. यावर शंकराचार्य असें म्हणतात कीं विदुर, धर्मव्याध, या मंडळीला ज्ञान प्राप्त झालें. आणि ज्ञानापासून जें फल निष्पन्न होतें तें झालेंच पाहिजे जेथें जेथें ज्ञान तेथें तेथें त्याचें फळ अशी व्याप्ति आहे. विदुर, धर्मव्याध, या मंडळीला या जन्मीं ज्ञान प्राप्त झालें आणि त्याचें फलहि झालें, असें म्हणणें सयुक्तिक नाहीं. विदुर, धर्मव्याध, यांच्या पूर्व जन्मांतरीं जे संस्कार झाले होते, त्यामुळें त्यास ज्ञान प्राप्त झालें, असें कारण आहे. बरें, इतिहासपुराणामध्यें चारीहि वर्णांस शिकवावें असें निरूपण आहे म्हणून चारीहि वर्णांस अधिकार आहे हा अधिकार इतिहासपुराण-श्रवण करण्याचा, आणि वेदाध्ययनाचा नव्हे. यावर रामानुज असें म्हणतात कीं ज्यांना संसारानें भय वाटलें आहे त्यांच्याकरितां सांख्य, योगादि शास्त्रांनीं उपाय रचून ठेविला आहे. तो उपाय असा प्रत्यक्ष आणि अनुमान हीं प्रमाणें यथार्थ वस्तूचें ज्ञान होतें तें कसें? प्रत्यक्ष आणि अनुमान यांच्या योगानें ज्ञानाचा बोध व्हावा अशी इच्छा उत्पन्न होते ती इच्छा उत्पन्न झाली कीं प्रत्यक्ष ज्ञान जिज्ञासु कळूं लागतो प्रत्यक्ष प्रमाणाची तऱ्हा निराळी, आणि अनुमानाची तऱ्हा निराळी यांच्या योगानें अर्थ एकच कीं चैतन्य म्हणून कांहीं आहे. तें नित्य आहे. तें शुद्ध आहे. तें स्वयंप्रकाश

and the Purâna declare that all the four castes ought to be instructed But this permission includes not the study of the Vedas, but a title merely to hear the Itihâsa or the Purâna read or explained On this Râmânuja observes —those, who have become world weary, have a remedy provided for them by the Sânkhya and Yoga systems of philosophy. The remedy is this—direct observation and inference produce the knowledge of that which really exists How is this? Direct observation and inference produce a desire for knowledge When such a desire is produced, the enquirer comes to know that there is such a substance as Chaitanya or Spirit, because he finds that the method of direct observation, though it differs from inference, leads to the same result The Spirit is eternal, pure, and self resplendent unequalled and unaffected It is the substratum of all that exists All, without this Spirit, does not really exist, but seems to exist, because of its connection with the Spirit All this explanation is in its place, and to such knowledge the Shûdra has a title But he has no title to that knowledge which follows the investiture of the sacred thread and the study of the Vedas On this Vallabha observes —great men among the Shûdras successfully acquired a special knowledge of the Smritis and of the Purânas, yet the Shûdra by caste has no title to the performance of sacrificial rites He has, therefore, no title to the acquisition of the knowledge, which follows the study of the

आहे तें अद्वितीय आहे आणि तें निर्विकार असून सर्वांचें अधिष्ठान आहे त्याच्या शिवाय बाकी जें जें राहिलें तें तें त्याच्या योगानें भासत अशा प्रकारचें जें विवेचन आहे, ते ठीक असा एक प्रकार आहे अशा प्रकारची उपासना शूद्रानी करावी परंतु वेदपूर्वक उपनयन करून, ज्ञानप्राप्तीचा अधिकार शूद्रास नाही यावर वल्लभ असे म्हणतात कीं, स्मृति, पुराण यांचें ज्ञान महान् महान् जे शूद्रजातीतील पुरुष होऊन गले त्यास विशेष कारणामुळ झालें हें खरें तथापि जातिशूद्राना कर्माचा अधिकार नाही म्हणून वेदपूर्वक अध्ययन करण्याचा त्यास अधिकार नाही. यावर मध्वाचार्य म्हणतात — विदुर आणि दुसरी जी मडळी झाली त्याच्यामध्यें सहज ज्ञान उत्पन्न होऊन गेलें होत म्हणून या गोष्टमध्ये काहीं विशेष नाही या सबंधी उपनिषद्वाक्याचें भाषातर एणेंप्रमाणें "पुढ हा जर शूद्र वेद ऐकू लागला तर त्याच्या कानामध्यें शिसें किंवा लाख ओतावी" "अरे, शूद्र हा चालतें स्मशान आहे. म्हणून त्याच्या जवळ वेदाध्ययन करू नये" 'शूद्राने वेदोच्चारण केलें असता जिव्हा कापावी अध्ययन केल असता शरीर तोडावें" 'शूद्राला ज्ञान देऊ नये' "ज्याचें उपनयन होत त्यानाच अध्ययनाचा, यज्ञकरण्याचा, दानाचा अधिकार आहे" 'चारी वर्णांनीं ऐकावं"

Vedas On this Madhvâcharya observes —men like Vidura and others naturally obtained the knowledge of Brahma, and therefore, there is nothing particular about this *The following is the* translation of the Upanisad texts quoted 'The ears of the Shûdra, hearing the Veda explained, are then to be filled with lead and lac "Well the Shûdra is a moving burning ground and therefore, the Veda is not to be studied when he is near 'The tongue of the Shûdra is to be cut if he pronounces the Veda If he studies it his body is to be cut Never teach a Shûdra

He, who is invested with the sacred thread has alone a title to *the study of the Veda* to the performance of sacrifices and to receiving gifts Let the four castes hear it

सूत्राणि.

कंपनात् ॥ ३९ ॥

भावार्थः । प्रसंगाद् देवादीनामधिकारविचारे कृते वाक्यसमन्वयमाचार्यः पुनः करोति । अनुसधास्यमानोपनिषद्वाक्ये एजतिधातुः प्रयुक्तः । तस्य कोऽर्थः । एजति नाम कंपते । सर्वं जगत् कंपते । कदा । सति प्राणे । तेन प्राणस्य कंपनकारित्वात् प्राणो न तु वायुर्न वाऽशनि. । प्राणस्तु परमेश्वरः। अन्येषामुपनिषद्वाक्यानामेकवाक्यतया तदुपनिषद्वाक्यस्योपक्रमोपसंहाराभ्यां च वायुः परमेश्वर इति सिध्यति ॥ तत्र शंकरः। पूर्वोत्तरयोर्हि ग्रंथभागयोर्ब्रह्मैव निर्दिश्यमानमुपलभामहे । इहैव कथमकस्मादतराले वायु निर्दिश्यमानं प्रतिपद्येमहीति ॥ रामाऽनुजस्तु कृत्स्नस्य जगतोऽग्निसूर्यादीनां चाऽस्मिन्नगुष्ठमात्रे पुरुषे प्राणशब्दनिर्दिष्टे स्थितानां सर्वेषा ततो निःसृतानां तस्मात् सजातमहद्भयनिमित्तमेजन कपन श्रूयते । + + + परस्य ब्रह्मणः पुरुषोत्तमस्यैवविधैश्वर्यावगतेरितश्चांगुष्ठप्रमित. पुरुषोत्तम इति ॥ वल्लभः अविशेषेण सर्वजगत्कंपन भगवद्धेतुकमेव भवतीति ॥ मध्वः एजतीति कंपवचनाद्बलवत्त्वो भगवानिति ॥

अनुसधेया-ग्युपनिषद्वाक्यानि ॥

न प्राणेन नाऽपानेन मर्त्यो जीवति कश्चन । इतरेण तु जीवति यस्मिन्नेतावुपाश्रितौ । क० व० ( ५.५. ) ॥ तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवाऽमृतमुच्यते । तस्मिन् लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन । + यदिदं किंच जगत् सर्वं प्राण एजति निःसृतं । महद्भयं वज्रमुद्यतं य एतद् विदुरमृतास्ते भवति । भयादस्याऽग्निस्तपति भयात् तपति सूर्यः । भयादिद्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पचमः । क० व० (६.३.) ॥ भीषाऽस्माद् वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषाऽस्मादग्निश्चेंद्रश्च । मृत्युर्धावति पंचम

इति । अ० वि० ( ८ ) ॥ अन्यत्र धर्मादन्यत्राऽधर्मादन्यत्राऽस्मात् कृताऽकृतात् । अन्यत्र भूताच्च भव्याच्च यत् तत् पश्यसि तद् वद । क० व० ( २.१४. ) ॥ तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति नान्यः पंथा विद्यतेऽयनाय । श्वे० उ० ( ३.८. ) ॥ तस्माद् वायुरेव व्यष्टिर्वायुः समष्टिरप पुनर्मृत्यु जयति य एव वेद । बृ० आ० उ० ( ३.३,२. ) ॥

३९. कारण कंपन आहे.

39. Because of (the root *eja* which means) to shake

३९ उपनिषद्वाक्यामध्ये कंपनार्थधातूचा प्रयोग केला आहे प्राण असला म्हणजे सर्व जगताचें कंपन होतें असाहि संबंध त्याच वाक्यामध्यें आढळतो म्हणून प्राणशब्दाचा अर्थ वायु किंवा वज्र असा करू नये प्राण म्हणजे परमेश्वरच हा या उपनिषद्वाक्याची एकवाक्यता केली आणि उपक्रम उपसंहाराकडे लक्ष दिलें म्हणजे वायु शब्दाचा अर्थ परमेश्वर असा होतो यावर शंकराचार्य असें म्हणतात की उपनिषदादि ग्रंथाचा पूर्व किंवा अपर भाग पाहिला असता जिकडे तिकडे ब्रह्मनिर्देश आहे असें आढळतें म्हणून एखाद्या वाक्यात मध्येच वायूचें निरूपण आहे असें म्हणणं असमंजस आहे. रामानुज यावर असे म्हणतात – सर्व जगत् आणि अग्निसूर्यादि देवता अंगुष्ठ-मात्र पुरुषाच्याठाया वास करीत आहेत. या अंगुष्ठमात्र पुरुषाचा प्राणशब्दानें निर्देश केला आहे तसेच सर्व जगत्, आणि देवादि त्या पुरुषापासूनच निघाले आहेत, आणि निघताना त्यास मोठें भय वाटलें, म्हणून वेदादिकामध्यें कंपनाचें निरूपण केलें

39 In a text of the Upanisad, a verb, which means *to shake*, is used, and the same text shows that the whole world shakes, when it can breathe, that is, when there is the Prana The Prana, therefore, is connected with the action of speaking, and must mean either wind or thunderbolt But this is not the case Prâna means the Great God. When the different Upanisad-texts are made to harmonize, and when their commencement and end are examined, it is plain that the term Vayu signifies the Great God Upon this Shankarâchârya observes —when the first or the last part of the Upanisads is examined, it is plain that they abound with references to the Supreme Spirit and, therefore, it is simply puerile to state that a particular text occurring among other texts has a reference to Vayu or air Upon this Râmânuja observes —the whole world and the gods like Fire and the *Sun abide in the Person*, who is as small as a thumb, and by the term Prana, a reference to such a person is made The whole world and such gods as Agni or Fire, Sûrya or the Sun, and others have proceeded from the

आहे. परब्रह्म जो पुरुषोत्तम त्याचेंच एव्हढें ऐश्वर्य असें आम्हास ठाऊक आहे म्हणून अङ्गुष्ठमात्र जो पुरुष तोच पुरुषोत्तम यावर वल्लभ असे म्हणतात की काहीं विशेष नसता सर्व जगताचें कंपन झालें तें भगवानानेंच केलें मध्वाचार्य असें म्हणतात की कंपनाचें जेव्हा वर्णन केलें आहे तेव्हा वज्र उभारून भगवान् राहिला आहे असें त्याचें वर्णन आहे. यासंबंधीं उपनिषद्वाक्याचें भाषांतर एणेंप्रमाणें " ज्याचा त्या दोघानीं आश्रय केला आहे असा दुसरा कोणीं आहे त्याच्या योगानें सर्व प्राणी जीवंत आहेत. (ह्या) प्राण आणि अपान याच्या योगानें मनुष्य जीवंत राहत नाही " " तेंच शुद्ध ज्योति, तेंच ब्रह्म, तेंच अमृत, असें वर्णन आहे त्याच्या ठायी सर्व लोक आश्रय धरून राहिले आहेत. आणि कोणीहि त्याचा अतिक्रम करीत नाहींत. जें जें हें काहीं जगत् आहे तें तें प्राणापासून उत्पन्न होऊन प्राण असतां कंपन पावतें उचल्लेलें हें वज्र महा-भयङ्कर असें जे जाणतात ते अमर होतात याच्या भयापासून अग्नि ताप करतो, याच्या भयापासून सूर्य तापतो, भयापासूनच इंद्र आणि वायु ( धावतात ), आणि पांचवा जो मृत्यु तो धावतो " " याच्या भीतीनें वायु वाहतो (याच्या) भीतीने सूर्य उगवतो याच्या भीतीनें अग्नि आणि इंद्र हे (धावतात,) आणि पांचवा मृत्यु धावतो. " " धर्म सोडून अधर्म सोडून, संचित सोडून आणि असंचित सोडून, जें होऊन गेलें आहे तें सोडून जें निराळें

Supreme Spirit, and while thus proceeding, a great fear was produced, and hence the gods are described in the Veda as shaking We know that the Supreme Spirit alone possesses this power. Hence the Person as small as a thumb spoken of in the Upanisads, is the Highest Person On this Vallabha observes —the whole world shook without any cause, and this shake was caused by God himself Madhvâchârya observes —when the shaking of the whole world is described, God is also described as standing with thunderbolt in hand. The following is the translation of the Upanisad texts quoted. "Man does not live in them two, but all live in Him (who is) other (than they two) and on whom the lower and higher breaths depend for their existence." "It alone is white It is Brahma. It alone is called nectar In it all these regions stand, and none can transgress it All this world has proceeded from the breath (Prâna) and shakes till it has Prâna. Those, who know this thunderbolt raised and extremely dreadful, become immortal. From his fear fire burns, from his fear the Sun causes heat, from his fear the gods Indra and Vâyu, run, and the fifth God Death (also runs) " From his fear the god Vâyu moves, from his fear the Sun rises from his fear Agni, Indra and fifth Death run " "Other than piety, other than impiety, other than what is done, other than what is not done, other than the past, and other than the future, tell me whatever thou seest." "Knowing it alone, one

ते तुला दिसते, ते सांग." "त्याला जाणल्यानेच मृत्युपासून सुटतो. मुक्त होण्याला दुसरा मार्ग नाही" "त्यापासून वायु ही व्यष्टि आहे, त्यापासूनच वायुहि समष्टि आहे म्हणून असें जो जाणतो तो अपमृत्यूला जिंकतो' समष्टि आणि व्यष्टि या दोन शब्दांचा अर्थ सांगून मागील सूत्राचा आणि या सूत्राच्या संबंधाचा उपन्यास आम्ही करतो एक व्यक्ति म्हणजे व्यष्टि, कोणी एक पदार्थ समष्टि म्हणजे सर्व ब्रह्मांड मिळून जो काय आकार होतो तो मनुष्याची सारी जाति घेतली म्हणजे मनुष्य ही समष्टि एकच कोणी मनुष्य घेतला म्हणजे ती व्यष्टि पचवीस सूत्रापर्यंत ज्या निरनिराळ्या शब्दांचा प्रयोग उपनिषदांत केला आहे त्या सर्वांचा अर्थ परब्रह्म होतो असें बादरायण दाखवितात आणि हाच क्रम पुन्हा एकोणचाळीसावे सूत्रापासून चालतो म्हणून पचवीस सूत्राची आणि एकोणचाळीस सूत्राची संगति लागते पण मध्यें जीं सूत्रं आली आहेत त्यामध्यें दोन विषयावर वाद केला आहे एक देवादिकांनीं ब्रह्मोपासना करावी किंवा नाहीं? आणि शूद्रादिकांना ब्रह्मोपासना करण्याचा अधिकार आहे किंवा नाही? या संबंधानें उपनिषदांत वर्णिलेल्या जाबाल आणि रैक याच्या कथा आल्या आहेत या कथांची पुष्कळ धडामोड करून शूद्रास अधिकार नाहीं असा भाष्यकारानीं पचवीसपासून एकोणचाळीस सूत्रांत सिद्धान्त केला आहे या सिद्धांता-

overcomes death There is no other way for salvation" 'From Him the god Vayu is universality, from Him the god Vayu is individuality, therefore, he, that knows this, escapes premature death" The terms *universality* and *individuality* being explained, the relationship between this and the preceding sûtras will be pointed out Individuality is opposed to universality When one object is referred to the object itself being one and being known as one and as unconnected with other objects causes the notion of individuality (Vyisti) Universality on the contrary, is the notion of the whole universe as forming a connected whole When the whole of the humanity is spoken of it is a notion of universality (Samasti) When a particular person is referred to, it is the notion of individuality Badarayana shows in the first twenty five sutras that all the different important terms used in the Upanisads refer to the Supreme Spirit He takes up the same subject from the thirty ninth sûtra Thus the twenty fifth and the thirty-ninth sûtras are connected In the intervening sûtras two different subjects are discussed The one is—whether the gods have a title to the worship of the Supreme Spirit, and the second subject is-whether the Shûdras have a title to the worship of the Supreme Spirit In this connection the stories of Jabala and Rainka are narrated These stories are twisted by commentators of the sûtras between the twenty fifth and the thirty ninth, to prove that the Shûdra has no title to the know-

परमात्मैव कार्यरूपेण विक्रियमाणद्रव्यस्याप्यात्मतयाऽवस्थाय तत् तदभवदित्युच्यते । इति । तत्र वल्लभ तस्माद् ब्रह्मपरिणामलक्षण कार्यमिति जगत्समवायिकारणत्वं ब्रह्मण एवेति सिद्ध ॥

अनुसंधेया-न्युपनिषद्वाक्यानि ॥

सच्च त्यच्चाऽभवत् । निरुक्त चाऽनिरुक्त च । + + + तदात्मान॰ स्वयमकुरुत । ब्र० वि० ( ७ ) ॥

२६. ( तें परब्रह्म निमित्त आणि उपादान कारण आहे ) कारण आपण आपणाला उत्पन्न करता झाला, कारण तो परिणाम आहे.

26 (That Supreme Spirit is the efficient and material cause) because He created Himself (and) because He is the modification

यासवधीं ज उपनिषद्वाक्य आहे त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें अर ही सब भूते आकाशापासून उत्पन्न होतात आणि आकाशाच्याच ठायीं लय पावतात

२६ शंकराचार्यांच्या आणि रामानुजाच्या मतें ही दोन सूत्रें आहेत "आपणाला उत्पन्न केल्यामुळे" इतकें एक सूत्र, आणि 'परिणामामुळें' हें दुसरें सूत्र आपणाला उत्पन्न करता झाला असें उपनिषद्वाक्य आहे त्याचा अर्थ काय ? आपण परिणाम पावता झाला इतका एकंदर सूत्रार्थ यावर शंकराचार्य म्हणतात – परिणाम म्हणजे काय ? माती किंवा दुसरीं द्रव्य हीं प्रकृति असें समजावें त्यामध्येच काहीं विकार करावा तो परिणाम उपनिषद्वाक्य कसें आहे ? • ६

26 In the opinion of Shankarâcharya and Râmanuja it is not one sûtra but two independent sûtras Because He created Himself is one sûtra and because He is the modification is another sûtra An Upanisad text states that He created Himself What is the meaning of this? He underwent a modification This is the general sense of the sûtra About this Shankarâchârya observes —what is meant by a modification? Let earth or any other substance be considered original When its original nature is affected it is modified Well what Upanisad text is referred to? He himself created himself Because the term *Himself* is used it is plain that nothing else is the efficient cause of the creation Because He is the modification is an indepen

त्यानें स्वतां केलें " 'स्वतां' शब्दाचा प्रयोग असल्यामुळें दुसरें काहीं निमित्त कारण झालें नाहीं, असा अर्थ निष्पन्न होतो 'परिणामात्मुळें' इतकें हें स्वतन्त्र सूत्र मानावें त्याचा अर्थ काय ? ब्रह्म हीच प्रकृति हेंच उपादान कारण त्या मध्येंच विकार झाला हाच परिणाम ब्रह्म हेंच कारण, आणि ब्रह्म हेंच कार्य अशी सृष्टि उत्पन्न झाली यावर मध्वाचार्य असें म्हणतात कीं विशेष पुढें होऊन जी करते तिचें नाव प्रकृति असा प्रकृति शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ आहे परब्रह्म तें निर्विकार आहे प्रकृति ही विकार उत्पन्न करणारी आहे परब्रह्म हेंच गोविंद तो गोविंद प्रकृतीमध्यें शिरला म्हणून त्याला प्रकृति असें म्हणतात दुसऱ्या रीतीनें उपनिषदर्थ लावला असता तो प्रामाणिक नव्हे यावर रामानुज असें म्हणतात कीं परिणाम शब्दाचा प्रयोग शास्त्र आहे तो असा परब्रह्म परिणाम पावलें तथापि त्याज्यांश परब्रह्मामध्यें काहीं नाहीं तें कल्याणाची एक राशिच जितक्या म्हणून जगतामध्यें वस्तु आहेत त्या सर्वांहून तें निराळें तें सर्वज्ञ त्याचा संकल्प नित्य सत्य जितक्या म्हणून त्याच्या कामना तितक्या परिपूर्ण झाले त्या, ज्याला मर्यादा नाहीं आणि जो अतिशयच असा त्याचा आनंद जगतामध्यें जितके म्हणून विषय आहेत तितक्याचा आत्मा होऊन राहिला आहे, कारण ते सर्व विषय त्याच्या *लीलेचीं साधनें आहेत ते विषय चैतन्य* आणि जड आहेत हा जो सारा प्रपंच

Brahma is the noumenon Brahma is the material cause It was affecte l It was *modified* Brahma itself is the cause and Brahma itself is the effect the world is thus created. About this Madhvâchârya observes — that, which springs forward and creates is named Prakriti. This is the etymological sense of the word The *Supreme Spirit* is above all modification The Prakriti produces all modifications The Supreme Spirit himself is *Govinda* Govinda entered the Prakriti He is therefore called Prakriti. Any other interpretation of the Upanisad text is not reliable About this Ramanuja observes —the term *Parinâma* is used Though the Supreme Spirit is modified yet there is nothing in it to be rejected He is one whole heap of blessedness He is unlike anything seen in this world He is omniscient He is eternally true He desires are ever gratified to the fullest extent He is boundless and His happiness is also beyond all bounds He is the soul of all things in this world because they are the means of his sport These things are either spiritual or material This vast expanse of existence has sprung from Brahma and He holds in himself the power of individualization up to the subtle elements and gross elements The original cause is the formal Supreme Spirit and the Supreme Spirit is described as pure and abounding in true intentions In Him the gross elements the subtle elements and the power of individualization exist They move in Him they are amalgamated with

तो ब्रह्मापासूनच उत्पन्न झाला आहे. आणि त्यामध्यें अहंकारापासून तों तन्मात्रा स्थूल भूतापर्यंत सर्व आलीं आहेत असें एक परमात्मस्वरूप आदिकारण आहे. त्यामध्ये परमात्मा शुद्ध, सत्यसंकल्पादि गुणविशिष्ट असे पूर्वी वर्णलेंच आहे त्यामध्यें महाभूतें, तन्मात्रा, अहंकार हीं सारीं त्याशीं एक जीव होऊन त्यामध्येंच मिळून गेलीं आहेत ही प्रलय झाल्यानंतरची अवस्था. त्यांतून अतिसूक्ष्म, जड, अमुकें असें सांगता येत नाहीं. त्याचें नांव तम, असलें एक निघालें; आणि तेणेंकरून ब्रह्मानें असा संकल्प केला कीं आपणामधूनच चैतन्य आणि जड असा मिश्रित प्रपंच आपणच बनावें जसा निरनिराळ्या विषयांचा परमात्म्याच्या ठायीं प्रलयकालीं लय झाला तसाच एकेक विषय जगदुत्पत्तीच्या वेळीं त्यामधूनच बाहेर पडला म्हणजे त्या विषयाच्या रूपानें परमात्माच बाहेर पडला. असा प्रपंच हा परमात्म्याचाच परिणाम आहे असें सर्व वेदांतशास्त्रामध्यें निरूपण केलें आहे नंतर सत् हें ज्याचें नांव, ज्यामध्यें चैतन्य आणि जड अशीं दोन्हींहि मिसळून राहिलीं आहेत, ज्यामध्यें देव आणि स्थावर पदार्थ आहेत असलें हें सर्व ब्रह्मांड उत्पन्न झालें तें ब्रह्मांड केवळ प्रकृतिरूप अतिसूक्ष्म स्थितीमध्यें होतें या प्रकृतीमध्यें परमात्मा शिरला आणि शिरून तिजमध्यें वास करता झाला ही पहिली कारणावस्था यामुळेंच परमात्म्याचें कार्यरूप आहे असें म्हणतात. वस्तुतः

Him. This is His condition after the destruction of the whole world From Him an extremely subtle and material something, that cannot be stated in words, proceeded Its name is *Tama* or the quality of darkness When it sprang forward, the Supreme Spirit intended that it should out of itself form a universe at once intellectual and material. As different things were absorbed into the Supreme Spirit at the time of the distraction of the world, so at the time of the recreation of the world the different things sprang out one by one Then the Supreme Spirit sprang out of itself in the form of these things Hence the Vedânta system states that all existence is the Supreme Spirit itself modified What is called *Sat* or the existent in the Supreme Spirit includes both the intellectual and the material, that is gods and material objects Thus the whole universe was created But this universal existence is the most subtle form of the pure and unmixed noumenon This noumenon or the Prakriti the Supreme Spirit entered and dwelt in it This is the first stage of causation, and the Supreme Spirit, therefore, is said to be an effect. Properly speaking, the noumenon returns into the Supreme Spirit, springs out of the Supreme Spirit, and when the Supreme Spirit enters it, the universe is produced The Supreme Spirit spiritually dwells in this world About this Vallabhâchârya observes —Brahma modified is an effect Brahma itself is the material cause The following is the

सूत्राणि.

## योनिश्च हि गीयते ॥ २७ ॥

भावार्थ । योनिशब्देन प्रकृतिर्वर्ण्यते ॥ तत्र शंकर यत् पुनरिदमुक्तं । ईक्षापूर्वकं कर्तृत्वं निमित्तकारणेष्वेव कुलालादिषु लोके दृष्टं नोपादानेष्वित्यादि । तत् प्रत्युच्यते । न लोकवदिह भवितव्यं । न ह्ययमनुमानगम्योऽर्थः । शब्दगम्यत्वात् त्वस्याऽर्थस्य यथाशब्दमिह भवितव्यमिति ॥ तत्र मध्व' । व्यवधानेन श्रुतिस्तु पुरुष विद्वद्भिरुच्यते । श्रुतिरव्यवधानेन प्रकृतिर्नामिति स्थिति । उभयात्मकश्रुतित्वाद् वासुदेव. परः पुमान् । प्रकृति पुरुषश्चेति शब्दैरेकोऽभिधीयत इति ब्रह्माण्ड इति ॥ तत्र रामानुज. । योनिशब्दश्चोपादानवचन इति ॥ तत्र वल्लभ. । तस्माद् योनिरपि भगवान् पुरुषोऽपि सर्वं वीर्यं जीवश्च सर्वं भगवानिति इदं सर्वं यदयमात्मेति सिद्धमिति ॥

अनुसंधेयान्युपनिषद्वाक्यानि ॥

कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिं । मु०उ० (३ १,३.) ॥ यद् भूतयोनिं परिपश्यन्ति धीरा. । यथोर्णनाभि. सृजते गृह्णते च । मु०उ०(१,१,७.)॥ योनिष्ट इन्द्र निषदे अकारि । ऋ० सं० ( १.१०४,१. ) ॥

---

प्रकृतीचा रूप परमात्म्याच्या ठायीं होता, परमात्म्यापासूनच ती प्रकृति उत्पन्न होते, तिजमध्येंच परमात्मा प्रवेश करता मग जगत् उत्पन्न होतें आत्म रूपानें या जगताच्या ठायीं परमात्मा वास करतो यावर वल्लभाचार्य म्हणतात – ब्रह्माचा जो परिणाम त्याचें नाव कार्य. ब्रह्म हें जगताचें समवायि कारण आहे यासबधीं जीं उपनिषद्वाक्यें आलीं

translation of the Upanisad text quoted "He became tangible and intangible (the earth the waters the light—these are tangible or Rûpi, the air and æther are intangible or Arûpi The reader will perceive that the Jains adopt the same division) It is describable and non describable It itself created itself"

## २७. कारण तें योनि असें वर्णितात.

## 27. And because it is sung as the source.

आहेत त्याचें भाषांतर पुढीलप्रमाणें. "तो रूपी आणि अरूपी झाला (पृथ्वी, आप, तेज हें रूपी द्रव्य. वायु आणि आकाश हीं अरूपी द्रव्यें. जैनहि असाच विभाग करतात हें वाचकांनी लक्षांत आणावें.) वर्णनीय आणि अवर्णनीय तें आहे. ते रचता आपणाला करते झाले."

२७. योनि-शब्दाचा अर्थ प्रकृति असा करायाचा. इतका सूत्रार्थ यावर शंकराचार्य म्हणतात.-कर्तृत्व म्हणजे विचारपूर्वक आणि संकल्पपूर्वक जें करणें तें हें निमित्तकारण. जें कुंभारासारखें निमित्तकारण तेंच मातीसारखें उपादान कारण असें म्हणता येत नाहीं. कारण ब्रह्माचें सृष्टिनिर्माण करणें विलक्षण आहे यासंबंधीं अनुमानादिकांची योजना करायाची नाहीं. या ठिकाणी शब्दप्रमाणाची योजना करायाची. यावर मध्वाचार्य असें म्हणतात -परंपरेनें उत्पत्तीला जो कारण तो पुरुष, आणि प्रत्यक्ष जी कारण ती स्त्री. दोन्ही स्वभाव वासुदेवाच्या अंगा आहेत. प्रकृति आणि पुरुष इत्यादिकांनी त्याचेंच निरूपण होतें. यावर रामानुज असें म्हणतात -सूत्रांतील योनि-शब्दाचा अर्थ उपादानकारण असा करावा. यावर वल्लभाचार्य असें म्हणतात -भगवान् हाच प्रकृति म्हणजे योनि हाच पुरुष हाच सर्व वीर्य. हाच जीव हा जो आत्मा तोच हें सारें, असें सिद्ध झालें. यासंबंधीं जी उपनिषदां

27. The term *Yoni*, used in the Sanskrit sutra, though interpreted into the source, really refers to the noumenon. This is the sense of the sûtra. About this Shankarâchârya observes — creation, that is, doing something after intending it thoughtfully, is *the efficient cause*. A potter is the efficient cause. He cannot be at the same time said to be the material cause such as the earth. But Brahman is in no way like a potter. Its powers are extraordinary. Our inferences cannot reach them. We must accept the testimony of others. About this Madhvâchârya observes —he who indirectly helps procreation is male. A female is its direct cause. Vâsudeva possesses both the powers. The terms *Prakriti* (noumenon) and *Purusa* (an agent) and similar characterizations refer to him alone. About this Râmânuja observes —the term *Yoni* used in the sutra signifies a material cause. About this Vallabha observes —the Lord is the noumenon, that is, the *Yoni*. He is the male. He is all vigour. He is the soul. This spirit, it is proved, is, therefore, all. The following is the translation of the Upanisad texts quoted. "Unto the creator, the Lord, the Purusa, Brahma, and the source." "The wise knows which to be the source of the universe, as a spider draws a thread out of itself and draws it into itself." 'Oh Indra, *Yoni*, that is, the

सूत्राणि.

एतेन सर्वे व्याख्याता व्याख्याताः ॥ २८ ॥

भावार्थः । उपनिषद्वाक्यशेषाः सर्वे प्रथमाध्यायेन व्याख्याताः । तत्र सांख्यसिद्धांतः खडितः । जगत् कथं सृष्टं पुरुषप्रकृत्योः कः संबंधः किं पुरुषत्वं किं प्रकृतित्वमित्यपि निरूपितं । अद्वैतसिद्धांते शुद्धचैतन्यस्याऽस्तित्वं । भ्रांत्या विवर्तात्मकं जगत् । प्रकृतिर्भ्रमः । शुद्धचैतन्यरूपस्य ब्रह्मण उपादानकारणत्वं ॥ द्वैतसिद्धांते ब्रह्मणो निमित्तकारणत्वं । कथं तर्हि जगदिदं । अव्यवधानेन परमेश्वरेण हरिणा उपाधिर्निर्मितः ॥ विशिष्टाऽद्वैतसिद्धांते ब्रह्मण उपादानत्वं निमित्तत्वं च ॥ शुद्धाद्वैतसिद्धांते ब्रह्मणः समवायिकारणत्वं । अत्र प्रथमसिद्धांते उपाधिः प्रकृतिर्भ्रांत्यात्मिका अनित्या ज्ञानेन नश्यति । द्वितीयसिद्धांते उपाधिर्नित्या ज्ञानेन हरिः साक्षात्क्रियते । तृतीयसिद्धांते उपाधेर्नित्यत्वे सति ज्ञानेन जगत्कर्तृत्वं लक्ष्मीपतित्वं च विहायेश्वरस्य सर्वान् गुणान् मुक्ताऽवस्थायां जीवः प्राप्नोति । चतुर्थसिद्धांते चिदचिदात्मकं जगद् ब्रह्मणः परिणामः । यदा तमः प्रभवति तदा जगत्सृष्टिः । इति चतुर्णां सिद्धांतानां प्रकृतिविषयको निष्कर्षः ॥

इति प्रथमाध्यायस्य चतुर्थः पादः ॥

---

नयें आलीं आहेत त्याचे भाषांतर एणें प्रमाणें. " कर्ता, परमेश्वर, पुरुष, ब्रह्म, योनि " जें सर्व ब्रह्मादाची योनि असें पंडितजन जाणतात. जसें कोळी-किडा आपणच उत्पन्न करतो आणि आपणच गिळून टाकितो." " हे इन्द्रा, योनि म्ह-

altar is the place prepared thy seat "

## उपसंहार.

या पादामध्ये विशेष विचार काय झाला आहे हें दाखवून सर्व अध्याया-मध्ये सामान्य विचार काय आहे याचें निरूपण करायाचें. चवथ्या पादाच्या सात सूत्रापर्यंत एक अधिकरण वर्णिलें आहे त्यामध्यें महान्, पर, अव्यक्त हीं जीं पदें उपनिषदांत योजिलीं आहेत त्यांचा अर्थ सांख्यशास्त्रांतील जड प्रकृति असा करायाचा किंवा चैतन्य असा करायाचा? असा विचार होऊन चैतन्यरूप परब्रह्म असा त्या पदाचा अर्थ करायाचा. पुढील आठ, नऊ, आणि दाहा या सूत्रामध्यें अजा या पदाचा अर्थ काय करायाचा हा विचार झाला. अजा म्हणजे सांख्य-सिद्धांतांतील जड प्रकृति नव्हे. अजा म्ह-णजे चैतन्यरूप ब्रह्माचीच एक अवस्था. ती अवस्था ही सृष्टि निर्माण होण्याच्या पूर्वींची म्हणून तीस प्रागवस्था असें म्हटलें आहे. ती तांबडी, काळी, पांढरी असून तेज, पाणी, आणि अन्न याची बनली आहे असें उपनिषदांत वर्णिलें आहे. पुन अकरा, बारा, आणि तेरा या सूत्रामध्यें "पंचपंच जना" या वाक्याच्या अर्थाचा विचार केला आहे. त्याचा अर्थ सांख्य सिद्धांतांतील पंचवीस तत्वें नव्हे. तर पांच प्राण असा अर्थ ठरविला आहे. चवदाव्या आणि पंधराव्या सूत्रीं सत् आणि असत् या दोन पदाच्या अर्थाची व्यवस्था केली आहे. सत् म्हणजे विकृत ब्रह्म, आणि असत् म्हणजे अविकृत ब्रह्म

## SUMMARY.

We will first show what the particular subject of this Fourth Chapter of the First Adhyâya is, and then examine the subject matter of the Adhyâya as a whole. The first seven sûtras of this Fourth Chapter form a group in which the interpretation of the terms *Mahân, Para, Avyakta*, used in the Upanisad, is discussed. Are these to be interpreted as referring to the material noumenon recognized by the Sânkhyas or merely to the spirit? The conclusion established is that these terms signify the Supreme Spirit alone. The next group of the eighth, ninth, and tenth sûtras discusses the interpretation of the term *Ajâ* used in the Upanisads. The conclusion established is that the term *Ajâ* does not signify the material noumenon recognized by the Sânkhyas. It signifies the Supreme Spirit, which is pure knowledge or intellection. This condition is premordial. It is described in the Upanisads as red, black, and white, and consisting of light, water and food. Again, the next group of the eleventh, twelfth, and the thirteenth sûtras discusses the interpretation of the phrase *Panchapanchajanâh*. The conclusion established is that the phrase does not signify the twenty five elements recognized by the Sankhyas, but the five breaths. The fourteenth and fifteenth sûtras interpret the terms *Sat* and *Asat* used in the Upanisads, and state that *Sat* is impure Brahma, and *Asat* is pure

सोळा, सतरा, आणि आठरा सूत्रामध्यें कर्म, पुरुष, इत्यादि शब्दांचा विचार झाला आहे. त्यामध्यें परमात्माच कर्ता असें सिद्ध केलें आहे. " आत्मा पहावा, त्याविषयीं श्रवण करावें, त्याविषयीं मनन करावें " इत्यादि वाक्य आहे. त्यामध्यें हा आत्मा जीवात्मा किंवा परमात्मा, कोणता समजावा असा संशय पडला. परमात्मा समजावा असा सिद्धांत ठरला. तेवीस, चोवीस, पंचवीस, सव्वीस, आणि सत्तावीस या सूत्रामध्यें ब्रह्म हें निमित्त-कारण आहे आणि उपादान कारणहि आहे असा सिद्धांत केला आहे. अठ्ठावीसव्या सूत्रीं वैशेषिक सिद्धांताचें, बौद्धादि सिद्धांताचें खंडन झालें आहे, असें वर्णिलें आहे अशीं हीं अधिकरणें अद्वैत सिद्धांताप्रमाणें रचलीं आहेत. हाच विषय घेऊन द्वैत, विशिष्टाद्वैत, आणि शुद्धाद्वैत आचार्यांनीं आपआपल्या मतांस अनुसरून उपन्यास केला आहे. तीं तीं विशेष सूत्रें पाहिलीं म्हणजे तो लक्षात येईल

एकंदर या पहिल्या अध्यायामध्यें, सर्वदशोपनिषदांत जे जे नाना विचार झाले आहेत त्याच्या व्यवस्थेवर कटाक्ष ठेवला आहे तो प्रकार असा जैन, बौद्ध, वैशेषिक, सांख्य यांच्याशीं वेदांताचा विरोध आहे. वेदांताचा सिद्धांत काय आणि यांचा सिद्धांत काय हें सांगण्याकरितां एक तक्ता बनविला असतां यांचें त्यांच्या सहज लक्षात येईल, तो तक्ता हा.

Brahma. The group of sixteenth, seventeenth, and eighteenth sûtras explains the meanings of the words *Karma*, *Purusa* and others used in the Upanisads, and states that the Supreme Spirit alone is the creator The Upanisad text—"the spirit ought to be seen, ought to be listened to, and ought to be meditated upon," —is to be interpreted The question raised is—does the word *spirit* signify the human spirit or the Supreme Spirit? The solution is that the Supreme Spirit is meant The sûtras from the twenty third to the twenty-seventh state that Brahma is both the efficient cause and the *material cause of the universe. The* twenty-eighth sutra refutes the *Vaishesika*-doctrine and the Bouddha-doctrine This is the way the *Adraita* Vedântins arrange the subject-matter of the sûtras of this Chapter. The same *sûtras in their order, are taken* up by the *Dvaita*, *Vishistâdvaita*, and *Shuddhâdvaita* Âchâryas, and interpreted in conformity with their own doctrines The notes on the sûtras referred to give detailed information

The first Adhyâya adjusts the interpretation of terms used in the ten Upanisads and discusses the questions which this interpretation raises The Vedântins, no matter to what school they belong, are opposed to the *Jains*, the Bouddhas, the Vaisheṣikas, that is, the dilecticians, and the Sânkhyas *The following* table shows the points of difference between these and the Vedântins.

वेदांत.

| अद्वैत. | द्वैत. | विशिष्टाद्वैत. | शुद्धाद्वैत. |
|---|---|---|---|
| चैतन्यरूप परब्रह्म मात्र आहे. दुसरें का हीं नाहीं. जड जे जे दिसतें तें सर्व केवळ भ्रांति आहे. | वैशेषिकाचा आणि याचा सिद्धांत एक. | सत्यसंकल्प सर्व मंगळ गुणनिधि परमेश्वर आहे. त्यानें सृष्टि निर्माण केली आहे. | परब्रह्म आहे, आणि तेंच सर्व ब्रह्मांड बनलें आहे. |
| परब्रह्म तेंच उपाधींत सांपडलें की जीवात्मा. उपाधि म्हणजे संसार. | ... | अग्नीपासून जशा ठिणग्या निघतात तसे जीव नारायणापासून निघतात | जीवात्मा हा परमात्म्याचा परिणाम आहे. |
| परब्रह्माच्या ठायीं एक कांहीं अवस्था-विशेष आहे. तीचें नांव प्रागवस्था. ती कांहीं परब्रह्माची शक्ति आहे. तीच माया. तिजपासून चिदचिदात्मक हें जगत् उत्पन्न होतें. | ... | नारायणापासूनच प्रकृति उत्पन्न होते, आणि तिजमध्यें नारायण प्रवेश करतो आणि आपण पृथक् व्हावें आणि प्रजा उत्पन्न करावी असा संकल्प करतो. आणि त्यापासून सृष्टि उत्पन्न होते. | जड हा ब्रह्माचाच परिणाम, चैतन्य हा ब्रह्माचाच परिणाम, जसा जसा आविर्भाव होईल त्याप्रमाणें सृष्टमध्यें रूपें दिसून येतात. |

| विषय. | अन्यसिद्धांत. | | | साधारण. |
|---|---|---|---|---|
| | १ जैन. | २ बौद्ध. | ३ सांख्य. | ४ वैशेषिक. |
| | असा ससार अनादि चालला आहे. | | | |
| कर्म. | कर्म आहे. तें जडाचा गुण. जड संयोगासपुद्गल असें म्हणतात. जडाचा गुण आहे. म्हणून कर्महि जड आहे. तें आंत वाहत वाहत जाऊन जीवात्म्याला चिकटतें. याचें नाव आश्रव. मग जीवाचा बध होतो आणि तो ससारात पडतो. | कर्म मोठें प्रबळ आहे. तें अनादि आहे. त्या कर्मांपासून अविद्या उत्पन्न होते आणि तेणेकरून वेदनादि पचस्कध उत्पन्न होऊन बंध होतो. | कर्म आहे त्यापासूनच अविद्या उत्पन्न होते; आणि तिजमुळें जीव बधामध्यें पडतो. | कर्म आहे. अज्ञानामुळें जीवास दु.ख होते आणि तो बधात पडतो कर्म अनादि. |
| पुनर्जन्म. | जें जें कर्म करावें त्या त्यापासून सस्कार उत्पन्न होतो तो सस्कार कर्मभोगावाचून जायाचा नाहीं. म्हणून जीवाला पुन. पुन. जन्म घ्यावा लागतो. आणि पुन पुन. मरण-दु.ख भोगावें लागतें. | कर्म आहे. जें जें काही या जन्मीं करावें तें तें कर्म मात्र अवशिष्ट राहतें. मरतेवेळीं सर्वांचा नाश होतो केवळ कर्म अवशिष्ट राहतें मग पुनर्जन्म झाला की त्या कर्माभोंवतीं पचस्कंध मिळतात त्यामध्यें सस्कार उत्पन्न होतात. त्यापासून विज्ञान उत्पन्न होतें. विज्ञानापासून नाम रूपें उत्पन्न होतात. त्या- | प्रकृति आणि पुरुष यांचा सयोग झाला म्हणजे ससार उत्पन्न होतो. त्याचें कारण कर्म. त्याचें कारण अविद्या अमुक आत्मा आणि अमुक प्रकृति यांविषयीं जो अविवेक त्याचें नाव अविद्या. या अविद्येपासून जीवास कर्म जडतें आणि कर्मापासून ससारबध उत्पन्न होतो | जीवात्म्यास कर्म जडतें अज्ञानामुळें. अज्ञान म्हणजे जगतातील पदार्थाविषयीं अज्ञान. |

| वेदांत. | | | |
|---|---|---|---|
| अद्वैत. | द्वैत. | विशिष्टाद्वैत. | शुद्धाद्वैत. |
| कर्म आहे. त्यामुळें जीव बंधांत पडला आहे. | कर्म अनादि बंध अनादि काहीना. तम अनादि काहीना संसार अनादि काहींना | कर्म आहे त्यामुळें जीवास अविद्या जडली आहे. त्यामुळे जीव बंधात पडला आहे | कर्म आहे. त्यामुळें जीवास अविद्या जडली आहे. त्यामुळे जीव बंधात पडला आहे. |
| कर्म अनादि आहे त्यापासून जन्मांतर. | पुनर्जन्म आहे त्याचें कारण कर्म त्याचें कारण अविद्या | पुनर्जन्म आहे त्याचे कारण कर्म त्याच कारण अविद्या. | पुनर्जन्म आहे. त्याचे कारण कर्म. त्याचें कारण अविद्या. |

| विषय. | अन्यसिद्धांत. | | | साधारण. |
|---|---|---|---|---|
| | १ जैन. | २ बौद्ध. | ३ सांख्य. | ४ वैशेषिक. |
| | | पासून षडायतन उत्पन्न होतें. तीं षडायतनें ही पंच ज्ञानेंद्रियें आणि मन. षडायतनापासून स्पर्शादि उत्पन्न होतात. त्यापासून वेदना होते. वेदनेपासून तृष्णा उत्पन्न होते. तृष्णेपासून उपादान रूप कर्म उत्पन्न होतें. आणि त्यापासून संसार. संसारमध्यें दुःख रे दुःख. | | |
| धर्म | संसार करू नये प्रव्रज्येनें कर्मांचें खंडन होतें. म्हणून प्रव्रज्या म्हणजे संन्यास हा मुख्य धर्म. संन्यास केल्यानें अहिंसारूप तप साधतें. गृहस्थानें देखील संन्यासाची चवदा उपकरणें नेहमीं नजरेपुढें ठेवावीं "अहिंसा परमो धर्म" चित्तखंडन मुख्य. तुकखंडनात काहीं एक नाहीं पुरुष साधु होतात. स्त्रिया साध्वी होतात तप हा मुख्य धर्म. | ध्यान हा मुख्य धर्म. श्रमण होऊन संन्यास घ्यावा, विहारामध्यें वास करावा, समाधि लावून ध्यान करावें. म्हणजे इंद्रियांवर जय मिळतो, आत्मदमन होतें, वैराग्य सिद्ध होते यति अहिंसा स्वीकारतात. गृहस्थ नीतीनें वागण्यास प्रयत्न करतात. बुद्ध गौतमाचें सेवन आणि सत्कार | संसार करावा. त्यापासून श्रौतकर्मांचे साधन सिद्ध करावें, श्रौतकर्मापासून चित्तशुद्धि होते. त्यापासून ज्ञान उत्पन्न होतें. धर्माचरण नेहमी करावें. | संसार करणें योग्य आहे संसारामध्यें ज्ञान संपादन करून घ्यावें. |

| वेदांत | | | |
|---|---|---|---|
| अद्वैत | द्वैत | विशिष्टाद्वैत | शुद्धाद्वैत |
| ससार करून श्रौतादि कर्मे करावी तगकरून चित्तशुद्धि होते वैराग्य प्राप्त होतें जरी सर्व जगत् भ्रांति आहे तरी सदाचरण करणे आवश्यक आहे मूर्तीची पूजा गुरुद्वारेकरून सगुणाची पूजा | ससार करावा हरिभक्ति करावी सदाचारानें वागाव मुख्यत्वेंकरून विष्णूची पूजा मठाचा अधिकार शिरसा मान्य | ससार करावा, श्रौतकर्मे करावा, नीतीनें वागाव, नारायण, याचा पूजा | ससार मुख्य, कृष्णाची पूजा - गुरुभक्ति फार |

| विषय | अन्यसिद्धांत. | | | साधारण. |
|---|---|---|---|---|
| | १ जैन. | २ बौद्ध. | ३ सांख्य. | वैशेषिक. |
| | हा पूर्ण उत्सर्गमार्ग. जितकें ज्याच्या हातून होईल तितकें त्यानें आचरण करावें हा अपवाद मार्ग तीर्थंकराची पूजा | | | |
| स्वर्ग नरकादि लोक. | पुण्यपापप्रमाणें प्राप्ति. | पुण्यपापप्रमाणे प्राप्ति. | पुण्यपापप्रमाणें प्राप्ति. | पुण्यपापप्रमाणें प्राप्ति. |
| मोक्ष. | कर्माचा निरोध करावा अथवा तें धुऊन धुऊन नाहीसें करावें याचें नाव संवर आणि निर्जरणा तेणेंकरून कर्म नाहींसें होतें आणि तप सफल होतें. मग संसारबंध सुटला जन्ममरण सुटलें मग जीव सिद्ध शिलेवर सतत निरतिशय आनंदानुभव करीत बसतो | कर्माचा नाश म्हणजे अविद्या सुटते मग पुनर्जन्म नाहीं मग निर्वाणपद-प्राप्ति | ज्ञानापासून कर्मनाश तेणेंकरून स्थूलभूताचा तन्मात्रात लय होतो. तन्मात्राचा ज्ञानेंद्रियाचा कर्मेंद्रियाचा आणि मनाचा अहंकारामध्यें लय होतो. त्याचा बुद्धीमध्यें लय होतो. बुद्धीचा प्रकृतीमध्यें लय होतो शुद्ध अव्यक्त प्रकृति नित्य आहे. तिचा आणि जीवाचा वियोग झाला म्हणजे बंध सुटला. | ज्ञानापासून कर्मनाश त्यापासून निश्रेयस म्हणजे निरतिशय सुख जड जगत् सतत चाललेंच आहे |
| प्रळय | ब्रह्मांडाचा प्रळय झाला असता परमाणु राहतात म्हणून परमाणुरूप जड द्रव्याचा प्रळ | निर्वाण म्हणून अतिउत्तम चिरंतन स्थिति आहेच तिची आणि सांख्यशास्त्रातील पु- | प्रकृतीचा आणि पुरुषाचा संयोग झाला म्हणजे जगदुत्पत्ति वियोग झाला कीं सर्व संपलें | कारणरूप परमाणु नित्य आहेत जीवात्मे अनंत नित्य आहेत परमेश्वर स्वतंत्र आहे. |

| NAMES. | Rs. | A. | P. |
|---|---|---|---|
| Mr. G M. Hasubnis. | 37 | 2 | 0 |
| Dr Bhau Shirke | 5 | 6 | 0 |
| Mr. Sadashiva B Bhate | 17 | 4 | 0 |
| „ A. Sankariah | 0 | 12 | 0 |
| Babu Navina Chandra Rai. | 16 | 2 | 0 |
| Mr V N. Narsimmayengar | 5 | 6 | 0 |
| H. H. Thakorsaheb of Wadhwan | 21 | 8 | 0 |
| Mr. Gurunath B. Phatak. | 10 | 12 | 0 |
| Babu Shrinath Datt. | 5 | 6 | 0 |
| Rao Saheb K B Marathe | 16 | 2 | 0 |
| Babu Ramkali Choudhary. | 5 | 12 | 0 |
| Mr Shriram B Jattar. | 5 | 6 | 0 |
| Mr Keshava S Deshpande. | 5 | 6 | 0 |
| R B Bechardas Ambadas, C. S I | 5 | 6 | 0 |
| Mr. P. Chintsal Raw. | 5 | 6 | 0 |
| Dr. G. Thibault | 5 | 6 | 0 |
| Pandit Shaligram G Misar | 5 | 6 | 0 |
| Mr V. Krishnaya | 10 | 12 | 0 |
| Rao Saheb Ragho N Kondvikar. | 6 | 2 | 0 |
| Lalla Jawala Purshad. | 5 | 6 | 0 |

## NOTICE TO SUBSCRIBERS.

Gentlemen, who have not as yet sent in their subscription, are hereby requested to kindly remit it as early as possible.

**As we are compelled, on account of the ill-health of the Editor, to stop "the *Sad*darshana-Chintanika" for some time from January 1883, we hereby notify that subscriptions, in advance for 1883. will not be received until further notice. The remaining numbers of 1882 are ready and will be duly sent to the subscribers.**

## INDIA

| | | Rs. | A. |
|---|---|---|---|
| For one year, in advance | | 5 | 0 |
| Single copies | | 0 | 8 |

Besides six annas for postage at the rate of half an anna for a copy

| | | Rs. | A. |
|---|---|---|---|
| Rates including postage for | England | 7 | 0 |
| | Ceylon | 6 | 0 |
| | America | 7 | 0 |

*N. B.* The subscription is to be paid *in advance*. No accounts of arrears can be kept.

All letters connected with this periodical should be addressed to the Manager *Saddarshana* Chintanikâ No. 641, Sâdâshiva Petha Poona.